# माणूसघाणा,

## अर्थात त्रासिक प्रियकर

मूळ फ्रेंच नाटक:

'Le Misanthrope, ou l'Atrabilaire amoureux'

par

Jean-Baptiste Poquelin (Molière)

## संदर्भ

मूळ फ्रेंच नाटक:

Jean-Baptiste Poquelin (Molière): 'Le Misanthrope ou l'Atrabilaire amoureux', in Ouvres Complètes, vol. 2, Gallimard, Paris, 1971.

इंग्रजी भाषांतरे:

1. H. Baker and J. Miller: ' The Man-hater', in Comedies by J.B. Poquelin, vol. 1, J.M. Dent and Sons Ltd., London, 1929.
2. Donald M. Frame: 'The Misanthrope', in Molière (Comedies), The Franklin Library, Pennsylvania, 1983.
3. Richard Wilbur: 'The Misanthrope' and 'Tartuffe' by Molière, Harcourt, Brace and World, New York, 1965.

---

## पात्रपरिचय

**अल्सेस्त:** सेलिमेनचा प्रियकर
**फिलिन्त:** अल्सेस्तचा मित्र
**ओरॉन्त:** सेलिमेनचा प्रियकर
**सेलिमेन:** अल्सेस्तची प्रेयसी
**एलिआन्त:** सेलिमेनची मामेबहिण
**आर्सिनोए:** सेलिमेनची मैत्रिण
**अकास्त आणि क्लितान्द्र:** मार्की (सरदार)
**बास्क:** सेलिमेनचा नोकर
फ्रेंच सरकारच्या तैनातीतला एक **शिपाई**
**दुब्वा:** अल्सेस्तचा नोकर

---

**स्थळ:** पॅरिस
मूळ नाटकाचा पहिला प्रयोग ४ जून १६६६ रोजी पॅरिसमध्ये झाला.

# टीपा

मोलिएरचं 'Le Misanthrope' हे नाटक यमकयुगुलांमध्ये (rhymed couplets) विभागलेलं आहे. उदाहरणार्थ, दुसऱ्या अंकाची सुरुवात अल्सेस्तच्या ज्या भाषणाने होते, त्यातल्या पहिल्या दोन ओळी अशा आहेत:

Madame, voulez-vous que je vous parle net?
De vos façons d'agir, je suis mal satisfait.

म • दाम • वु • ले • वू • क • ज • वू • पा • र्ल • ने
द • वो • फॅ • साँ • द • जीर • ज • स्वी • माल • सा • ति • स्फे

यांत अर्थात 'ने' आणि 'स्फे' हे यमक आहे, आणि प्रत्येक ओळ अलेक्झांड्राइन वृत्तात आहे. या वृत्ताच्या नियमांनुसार प्रत्येक ओळीत बारा वाग्रेणू (syllables) असावेत अशी अपेक्षा आहे. परंतु प्रत्यक्षात मोलिएरनेच हा हिशेब काटेकोरपणे सांभाळलेला नाही; उदाहरणार्थ, वरच्या दुसऱ्या ओळीत बारा वाग्रेणू आहेत, पण पहिलीत अकराच आहेत. (जिथे वाग्रेणू सुटे होतात, तिथेतिथे मी • अशी खूण केलेली आहे.) या बाबतीत नाटकात बराचसा सैलपणा आहे; अध्येमध्ये काही ओळी वाजवीपेक्षा लांब आहेत, तर काही आखूड आहेत.

मूळ नाटकाच्या पाच अंकांत मिळून अंदाजे अठराशे ओळी (म्हणजे अंदाजे नऊशे यमकयुगुलं) आहेत. ही रचना इथेतिथे मुद्दाम थोडी विस्कटवलेली आहे. उदाहरणार्थ, पहिल्या अंकात एके ठिकाणी अशा ओळी आहेत:

**फिलिन्त:**
वोत्र पार्ती ए फोर्त
ए प, पार सा काबाल, आन्त्रेनेर...

**अल्सेस्त:**
इल नाम्पोर्त.

यात फिलिन्तची पहिली ओळ आणि अल्सेस्तच्या प्रत्युत्तराची ओळ यांत यमक आहे, पण मधली अर्धवट राहिलेली ओळ कशाशीच जुळत नाही.

❊

माझ्या भाषांतरामध्ये मी प्रत्येक 'ययु'चं भाषांतर 'ययु' नेच केलेलं आहे. उदाहरणार्थ, मूळ संहितेत दुसऱ्या अंकाची सुरुवात होताना अल्सेस्तच्या तोंडी चार ययु (म्हणजे आठ ओळी) आहेत, आणि भाषांतरातही त्या ठिकाणी नेमके चारच ययु आहेत. मूळ संहितेत यापुढे अल्सेस्तला सेलिमेन एका ययुने प्रत्युत्तर देते, आणि भाषांतरातही तेच करते, इत्यादि. त्याचबरोबर जिथेजिथे ययुंची रचना मोलिएरने विस्कटवलेली आहे, तिथेतिथे मी भाषांतरातही ती नेमकी तशीच विस्कटवलेली आहे. या अर्थाने मूळ संहितेचं हे 'समश्लोकी' भाषांतर आहे असं म्हणता येईल. अंकांची संख्या, प्रवेशांची संख्या, पात्रांची नावं आणि येणंजाणं हे सर्व काही तंतोतंत मुळाबरहुकूम आहे.

प्रत्येक ओळीत वाग्रेणू किती असावेत याची मी पत्रास ठेवलेली नाही, कारण (वर म्हटल्याप्रमाणे) मोलिएरनेही ती ठेवलेली नाही. अलेक्झांड्राईन वाचण्याची एक ठराविक लय असते; पण तिचा अर्थात इथे काही उपयोग नाही, तेव्हा ओळी कशा म्हणायच्या हे वाचकाने थोडाफार प्रयोग करून ठरवावं.

या भाषांतरित नाटकाचा कॉपीराइट जरी माझ्याकडे असला, तरीदेखील ते रंगमंचावर आणून पाहावं किंवा त्याचं प्रकटवाचन करावं असं कुणाला वाटल्यास त्यासाठी माझी परवानगी घेण्याची गरज नाही.

– जयदीप चिपलकट्टी

❊ ❊

# अनुक्रमणिका

# माणूसघाणा,
# अर्थात त्रासिक प्रियकर

---

## ❖ अंक पहिला ❖

---

**प्रवेश पहिला**

(रंगमंचावर फिलिन्त आणि अल्सेस्त.)

फिलिन्त:

आता रे? काय झालं तुला?

अल्सेस्त:

हे बघ, माझा नाद सोड

फिलिन्त:

पण – अढी घालून बसायची कसली ही खोड?

अल्सेस्त:

निघून जा इथून, सोड अगदी मला –

फिलिन्त:

पण ऐकून तर घे, चिडतोस कशाला?

अल्सेस्त:

माझा मी चिडणार, नाही ऐकणार काही

फिलिन्त:

तुझा हा तिरसटपणा मला समजत नाही
सांगतो तुला निक्षून, जरी असलो आपण मित्र –

अल्सेस्त:
आपण आणि मित्र?! ह्य! केवढा हा तुझा, गैरसमज विचित्र
आत्तापर्यंत भले असलो, आपण दोघे जवळ
तुझ्या स्वभावाचं आता उघडं पडलंय पितळ
तुझा रस्ता न्यारा आणि माझा रस्ता न्यारा
किडक्या तुझ्या मनामध्ये नको मला थारा

फिलिन्त:
तू म्हणतोस, अल्सेस्त, इतकी काळी माझी करणी –

अल्सेस्त:
अरे, शरम वाटो तुला, पोटात घेवो धरणी
क्षमा कधी नाही तुला, वागणं तुझं खोटं
शहाण्यासुरत्या माणसांनी रोखावी रे बोटं
कुणा पाहता तू मारावी अस्वलपंथी मिठी
सगळयां वाटे असतिल तुमच्या शतजन्मीच्या गाठी
आणाभाका, वचनेकवने, सुखलहरींचे वदनी भाव
स्नेहतुपाचा दिवा भडकला, प्रेमजलाने भरली बाव
पण मी नंतर जेव्हा पुसतो, कोण बरे हे राव?
डोकं खाजवून आठवू पाहतोस, तू त्याचं नाव
पाठ त्याची वळली म्हणता, विटतो तुझा गोडवा
मग तो तगला की मेला, नसते कसली पर्वा
आपल्याशीच झालो, आपण दगाबाज
भिकार बनाव सगळा, कोळून प्यायली लाज
असल्या बाबतीत कधी काळी, ठरलो जर मी दोषी
शर्मून जाऊन माझी मला, देऊन टाकीन फाशी!

फिलिन्त:
माझ्या मते हा नव्हे, फाशीएवढा गुन्हा

जज्जसाहेब कृपा करा, विचार करा पुन्हा
नका लावू टांगणीला, जीव माझा राया
नको आता आम्हावरी, वधस्तंभाची छाया

अल्सेस्त:
तुझ्या विनोदबुद्धीवरती, धरलीय वाटतं साय

फिलिन्त:
मग तूच सांग आता, मी करावं तरी काय?

अल्सेस्त:
असू द्यावा प्रांजळपणा, याचि मनी याचि देही
हृदयामधून आलं नसेल, तर नकाच बोलू काही

फिलिन्त:
जेव्हा कोणी घालून येतो आपुलकीचा बुरखा
चेहरामोहरा ठेवला पाहिजे आपण त्याच्यासारखा
शब्दावर शब्द ठेवला पाहिजे, नोटेवरती नोट
तोंडदेखलं हसलं पाहिजे लावून मधाचं बोट

अल्सेस्त:
पण मला नाही खुणावत हे प्रथितयशांचे रस्ते
चहू बाजुला ढोंगी बगळे, पुचाट आणिक सस्ते
ह्या बगळ्यांचे लचकत मुरडे पाहुन अवतीभवती
मना आवरू कसे कळेना, होईल वाटे वांती

तोंडदेखल्या गळाभेटींचे हे दानशूर दलाल
गुलगुलीत गप्पांचे हे कोकिळकंठी कलाल
सर्वांठायी समभाव ठेवणारे हे तोंडपुजे गाजरपारखे
माणूस सच्चा असो वा चंगीभंगी, यांना दोघेही सारखे
हे अमुकशेठ देतील पाहा तुम्हाला, आलिंगन घनदाट
आदर आणि स्नेहाच्या बाता मारतील अफाट

पण असल्या या प्रेमाची काय किंमत मोठी
जर हाच खेळ होणार असेल गोम्यागंप्यासाठी?

ज्याच्या अंगी असेल किंचित, स्वाभिमानी बाणा
त्याला शिसारी आणील हा बाजारू स्नेहाचा घाणा
असल्या प्रेमाची नसते काही मातब्बरी
ज्यामध्ये असतो प्रत्येक जण वाटेकरी
शहानिशा करूनच दिला पाहिजे सन्मान
ज्याचा मान सर्वांसाठी, त्याचा मान कवडीसमान
स्वत:वर जो लादून घेतो, ह्या खोट्या विनयाचा बोजा
तो माझ्या नजरेतून, उतरलाच म्हणून समजा
सोनं कोणतं, कोळसा कोणता, यांना नाही तमा
असल्या भुक्कड सबगोलंकाराला इथे नाही क्षमा
मुद्दा थोडक्यात असा, की मी आहे खास
जगमित्राबरोबर मैत्रीची मला नाही आस

फिलिन्त:
जगामध्ये राहणाऱ्यानं जगासारखं राहिलं पाहिजे
चार शहाणे म्हणतील तशी चाल आपली ठेवली पाहिजे

अल्सेस्त:
मी म्हणतो बिल्कुल नाही, आपण झालं पाहिजे खप्पी
उघडे पाडू मित्र लुब्रे, ढोंगी आणि दुटप्पी
मनावर नसावं माणसाच्या खोटेपणाचं केंजळ
बोलण्यात त्याच्या दिसावा अंतरंगाचा तळ
तुम्हाला जे वाटतं, त्याची देऊन टाका खुली कबुली
नका त्याला गाडून टाकू, व्याजस्तुतीच्या ढिगाखाली

फिलिन्त:
पण सहसा गोष्ट अशी होते, की अभिप्राय जर दिलात खरा
लोक सगळे कुत्सित हसतील, आणि चोरून घेतील भर्कन नजरा
नाही चालत व्यवहारात, इतका सत्यवचनी बाणा
झाकल्या मुठीत मन लपवा, यातच खरा शहाणपणा

रोज हजार लोकांसमोर, कोण बोलणार स्पष्ट?
अमुक नाही उचित आणि तमुक आहे अशिष्ट?
असेल समज कुणाबद्दल तुला पक्का तिरस्कार
तर तू त्याला काय हे तोंडावरती सांगणार?

अल्सेस्त:
हो –

फिलिन्त:
काय?! तुझ्या मते आपण, मिळून सांगूया एमिलीस
नको इतकी नटूस बाई, वय झालंय चाळीस
हैराण होतात बघून सारे, तुझ्या तोंडची पावडर

अल्सेस्त:
प्रश्नच नाही –

फिलिन्त:
आणि सांगूया डोरिलास, की अरे मूर्खबहाद्दर भंपकसुंदर
शौर्य तुझे हे लोकोत्तर अन्, तव सदनाचे रूप मनोहर
ऐकुन विटला नाही अजुनी, असा न कोणी उरला पामर

अल्सेस्त:
अलबत!

फिलिन्त:
तू मस्करी करतोयस –

अल्सेस्त:
मस्करी ना यात कणाची
राव असो वा रंक असो, ठेवी न मी पत्रास कुणाची
जेथे जातो तेथे, दांभिकता हे प्रचलित वित्त
डोळे जळती उद्वेगाने, खवळुन उठते माझे पित्त

संभावित अन् सन्मानित हे, बघुनी त्यांचे चाळे लोचट
चित्त खिन्नते, स्थैर्य लोपते, हृदयावरती पसरे सावट

चहूकडे दिसतो मला नागडा स्वार्थ, लांगूलचालन,
अन्यायाचं बेशरम समर्थन आणि सभ्यतेचं निर्दालन
मी आता जातो निघून, आजच्याआज रातोरात
ह्या नालायक जगाच्या मारतो एक श्रीमुखात

फिलिन्त:
तत्त्वचिंतनी क्रांततेत या नाही मजला राम
रडवे अपुले वदन बघोनी हसू लोटते जाम
बघुन आपणा मला आठवे 'नवऱ्यांची शाळा'
दोन धृवांवर भाऊ दोघे, त्यांचा अजब जिव्हाळा
ज्यांच्या –

अल्सेस्त:
सोड बाबा, सोड आता, थिल्लर या तुलना

फिलिन्त:
पण मी म्हणतो, तूच सोड या अवाजवी कल्पना
जग नाही बदलायचं, तू कितीही केलीस टीका
जर स्पष्टवक्तेपणाचा तुला फार असेल पुळका
तर एक सांगून टाकतो – थोडे आवर हे विलाप
आजूबाजूच्या ऐकणाऱ्यांना, हसून हसून लागतेय धाप
समाजनीती बदलावी, हे असेल भले तुझं लक्ष्य
पण परिणामी तू होतोयस मात्र, कुचेष्टेचं भक्ष्य

अल्सेस्त:
फार छान, फार छान! मला अगदी हेच हवं
अशी वार्ता ऐकून देखील मला स्फुरण येतं नवं
ह्या क्षणी तरी मला, सगळ्यांबद्दल आहे घृणा
उलट मला वाईट वाटेल, कुणी म्हटलं जर शहाणा

फिलिन्त:
एकूण – मानवजातीबद्दल तुझं मत बरं दिसत नाही

अल्सेस्त:
तिचा विचार जरी केला तरी अंगाची होते लाही

फिलिन्त:
तर तुझं म्हणणं यात होते प्रत्येकाचीच गणती?
नाही कुठला पामर कुठे अपवादस्पती?
न जाणो असूही शकेल असा कुणी मनुष्यप्राणी –

अल्सेस्त:
नाही. मी म्हणतो आहेत सगळे एकाच माळेचे मणी
त्यातले आहेत काही, चोरटे आणि पाजी
आणि बाकीचे सारे षंढ, ठेवतात यांची मर्जी
मी म्हणतो, माणसाच्या स्वभावाला लागलीय काही कीड
जर भ्रष्टाकार पाहून देखील, येत नसेल त्याला चीड

ज्या सोद्याविरुद्ध माझा, कोर्टात चालू आहे दावा
त्याचा मानमरातब नुस्ता पाहून घ्यावा
एवढं मात्र कुणीही ओळखावं सहजासहजी
सभ्य मुखवट्यामागचा हा इसम आहे पाजी
मधाळ त्याचे शब्द आणि गरगरणारी बुबुळं
कसे दडवू शकतील, त्याचं अंतरंग काळं?

घोळात घेऊन घबाड लाटून घुसलाय हा शिरजोर
खोड्यात ठेवण्याच्या लायकीचा हा खोटारडा हरामखोर
भिकारचोट धंद्यांवरती पैशानं मारलंय असं गिलीट
नीतिमत्ता शरमून जाते, आणि गुणवत्तेला येते फीट
कोणी किती शिव्या घाला, बोला त्याला काहीबाही
त्याची बाजू सांभाळायला, कुत्रं धावून येणार नाही

कुणी म्हणा पाजी आहे, नियत आहे ह्याची बरबाद
लोक म्हणतात अगदी खरं, आम्ही कुठे घालतोय वाद?

इतकं सगळं होऊन सुद्धा, वाकुडकण्याचं चाललंय बेश
आगतस्वागत करून घेतो, दिवाणखान्यात चंचुप्रवेश
खर्चुन पुसट शब्द जरासा, जिथे मिळणार असेल भत्ता
तिथे हा शिरलाच समजा, गुणवंताचा कटवुन पत्ता

चौफेर असत्याचे डांगोरे, दुतर्फा अनाचाराचे ढोल
काय सांगू, कशा सांगू, माझ्या मनाच्या जखमा खोल
सगळं बघून वीट येतो, डोक्यामध्ये जाते सणक
माणूस बघून वाटू लागतं, वाळवंटात जावं तडक

फिलिन्त:
बाबारे! रीत जगाची नको धरू रे इतकी भिंगाखाली
किरण दाटता यमनियमांचे करपे ख्यालखुशाली
प्रपंच अंमळ ढिसाळ असतो, ही नच लष्करशाळा
चुकता माणुस, चळता थोडा, करुया काणाडोळा
नियमपुस्तका बाधा व्हावी किंचित लवचिकतेची
कडेलोट हा नैतिकतेचा करतो सगळी गोची

विवेक म्हणतो करा सबूरी, टाळा दोन्ही टोकं
वर्तन करण्या थंड राहु दे खांद्यावरचं डोकं
जुन्या काळचे दंडक म्हणजे चिलखत लोखंडाचं
नव्या मनूच्या मांसल तनुला भारी त्याचा जाच
आम्हा पामरा नको बरे हा इतका खडतर वसा
काळासंगे निवळा थोडे, पुरते ताठर नसा

लोक म्हणतील तुझ्यासारखा कोणी नाही खुळा
तू जर का उघडू पाहशील जगदुद्धाराची शाळा
मला अशा रोजच दिसतात, निदान शंभर बाबी
ज्यांच्या पोटी लपली असते कसली तरी खराबी
आयुष्याच्या गाड्याची कुरकुर करतात चाकं

पण नाही कधी फिरवून घेत, मी माझं डोकं
मला नाही पदरी घ्यायचा, लोकसुधारणेचा वसा
मी माणूस चालवून घेतो, जसा असेल तसा
वृथा चिडचिड करण्याचा, तुला पक्का जडलाय आजार
माझी असते शांतवृत्ती, मग दरबार असो की बाजार

अल्सेस्त:
ज्या तुझ्या या वृत्तीचे, बडवतोस मोठे ढोल
तिचा देखील केव्हा तरी, ढळत नसेल का समतोल?
दाखला म्हणून असं समज: कुणा मित्रानं रचला बनाव
तुझा हक्क लाटण्यासाठी पाठीमागून घातला घाव
तुझ्याविरुद्ध पसरून दिल्या खोट्यानाट्या कपोलकथा
तर इतका थंड राहशील तू? भडकेलच ना तुझा माथा?

फिलिन्त:
जे दोष तुला खुपतात, ते दिसत असतात मलाही
पण जो मानवी स्वभाव आहे, त्याला काही उपाय नाही
उतावळी गिधाडं, उनाड माकडं, क्रूर लांडग्यांचा थवा
हे सगळं बघून मला, जितपत राग यायला हवा
तितकाच येतो राग मला, बघून माणसाचा बच्चा
हावरट, विधिनिषेधशून्य, आणि लुच्चा

अल्सेस्त:
काय?! कुणी मला लुबाडावं, कापावा माझा खिसा
आणि मी फक्त – जाऊ दे! आपला गप्प बसतो कसा
तुझ्याबरोबर वाद म्हणजे, वेळेचा खेळखंडोबा

फिलिन्त:
माझं थोडं ऐकशील, तर जिभेवर ठेवशील ताबा
तुझ्या प्रतिवादीवरचा, गहजब थोडा कमी कर
आणि खटल्याचं काय होतं यावर जास्त जोर धर

अल्सेस्त:
हे मात्र नक्की, मी तिकडे देणार नाही लक्ष

फिलिन्त:
पण तू असं म्हणशील, तर कोण घेईल तुझा पक्ष?

अल्सेस्त:
दुसरं कोण? सत्य, आणि माझा न्याय्य अधिकार

फिलिन्त:
म्हणजे न्यायाधीशाला तू स्वत: नाही भेटणार?

अल्सेस्त:
कशासाठी? नाही का माझा दावा, शंभर हिस्से पक्का?

फिलिन्त:
ते ठीक, पण कारस्थानांपासून तुला होऊ शकतो धोका
आणि –

अल्सेस्त:
नाही करणार मीहून काही, एवढा माझा निश्चय ठाम
असेल एकतर खरा हुकमी, नाहीतर खोटा माझा दाम

फिलिन्त:
यावर ठेवू नकोस भिस्त

अल्सेस्त:
पण माझी बाजू आहे रास्त

फिलिन्त:
तुझा शत्रू आहे पाजी,
आणि कुणी सांगावं त्याचा कंपू –

अल्सेस्त:
मला त्याची नाही काळजी –

फिलिन्त:
तू फसवतोयस स्वत:ला –

अल्सेस्त:
एकदाच आता ह्याचा, लावून टाकतो सोक्षमोक्ष

फिलिन्त:
पण –

अल्सेस्त:
मला उलट बरंच वाटेल, जर हरला माझा पक्ष

फिलिन्त:
अरे, पण तरी –

अल्सेस्त:
आहेत का कुणाच्या इतक्या नियती काळया
की करू धजतील माझ्यावर अन्याय दिवसाढवळ्या
की तिथवर येऊन ठेपली आहे माणसाची बुभुक्षा
खटल्याबरोबर या साऱ्याची आपोआप होईल परीक्षा

फिलिन्त:
काय माणूस आहे!

अल्सेस्त:
मी म्हणतो हरकत नाही, पैसा जरी गेला
एक फक्त मजा म्हणून, हरून बघू खटला

फिलिन्त:
अल्सेस्त, लोक जेव्हा ऐकतील हे तुझं बडबडसत्र
तेव्हा तू नक्की होशील, त्यांच्या टवाळीला पात्र

अल्सेस्त:
थट्टा करतील ते करोत बापडे –

फिलिन्त:
ते एक असो – पण, तुझी ही बिकट सत्त्वपरीक्षा
जी साऱ्यांनी उतरावी अशी तुझी अपेक्षा
ही तुझी सत्यनिष्ठा, की जिचा जयघोष करतोस सदा
दिसते का त्या स्त्रीमध्ये, जिच्यावर तू आहेस फिदा?

मला मात्र ह्याचं राहून राहून नवल वाटतं
की जनरीतीशी तुझं विळ्याभोपळ्याचं नातं
माणसांत राहणं तुझ्यासाठी, जणू काळं पाणी
पण तरी तुला आवडेलशी, भेटली एक तरुणी
पण इतक्यावर संपत नाही आश्चर्याची बाकी
कारण तुझी निवड अजब आहे, हे मात्र नक्की

तुझ्यावर लट्टू आहे, सुस्वभावी एलिआन्त
तुझा विरह झाल्यामुळे आर्सिनोए पडलीय क्लान्त
त्यांना तू अव्हेरतोस, ज्या पडल्या आहेत गळ्यात
आणि स्वखुशीने लोळतोस, सेलिमेनच्या जाळ्यात
वागण्याबोलण्यात ती म्हणजे पक्की पॅरिसची नार
खवचट कोट्या अन् विभ्रमांची सततची संततधार
ज्या साऱ्या नखऱ्यांचं, तुला आहे वावडं
त्यांची ती पट्टराणी, हे बरीक कसलं कोडं?!

तिचे दोष तू बघतच नाहीस, की माफ करतोस बघूनही?
की तिची जादू अशी, की उणीव उणीव राहात नाही?

अल्सेस्त:

तसं नाही. त्या तरुण विधवेचा मला आहे खरा लळा
पण तिच्या दोषांकडे मी नाही करीत काणाडोळा
तिला पाहताच उसळतो मनात भावनेचा भडका
पण दोष तिचे मी पाहिले आहेत, आणि केली आहे टीका

पण झालोय मी नामोहरम, अगदी करतो कबूल
मला वाटतं माझ्यावरती, टाकली आहे तिने भूल
लहानसहान त्रुटी तिच्यात आहेत खऱ्या हजार
पण तिच्यावरच्या प्रीतीचा जडलाय मला आजार
आहेच तिची गोडी अशी, आणि – तिच्या मनीचे डाग काळे
झटदिशी धुवून जातील, माझ्या प्रांजळ प्रेमामुळे

फिलिन्त:

इतकं जरी तू साधलंस तरी मी म्हणतो बेहत्तर –

तिचं तुझ्यावर प्रेम आहे असं तुला वाटतं का?

अल्सेस्त:

– हो तर!

मला तशी खात्री नसती, तर मी प्रेम केलंच नसतं

फिलिन्त:

मान्य. पण तिला तू आवडतोस, यावर तुझी आहे भिस्त
तर पाहून तिचे बाकी इच्छुक, का उठते मनात खळबळ?

अल्सेस्त:

कारण, हृदय माझं म्हणतं मला, ती सतत हवी जवळ
मनात माझ्या खोल उमटते, अनुरागाची गाज
आणि हे तिला सांगण्यासाठी मी इथे आलोय आज

फिलिन्त:

पण समज अल्सेस्त, थोडी माझ्या कलानं, जर तू केलीस निवड
तर मी म्हणेन, तिच्या बहिणीचं, एलिआन्तचं, पारडं आहे अधिक जड
तू तिला आवडतोस; शिवाय ती आहे, शहाणी आणि सुशील
तिला जर प्रतिसाद दिलास, तर नक्की सुखी होशील

अल्सेस्त:

खरं आहे. तू जे म्हणतोस तेच, मला सांगते माझी बुद्धी
पण बुद्धीचा काय उपयोग, जेव्हा होते प्रेमाची व्याधी?

फिलिन्त:

तुला आशा आहे खरी, पण मला शंका आहेत दाट
कदाचित –

---

**प्रवेश दुसरा**

(ओरॉन्त येतो.)

ओरॉन्त:

मला तिकडे कळलं, की करण्यासाठी बाजारहाट
गेली आहे एलिआन्त आणि सेलिमेन यांची दुक्कल
आपण आहात इथे, हे कळताच लढवली मी शक्कल
आणि अस्सा हजर झालो, तुम्हाला सांगण्याकरता
की माझ्या हृदयावरती, आहे तुमची निरंकुश सत्ता
आणि इच्छा आहे अंतरीची अशी माझी प्रखर
की लाभावी आपल्या अनमोल स्नेहाची पाखर

सुप्त गुणांची कदर होऊ दे, अशी आस ही मजला लागे
म्हणून म्हणतो दोहोंमध्ये, विणले जावे रेशीमधागे
उत्कटतेने सादर करतो, माझ्या मैत्रीचा हा आहेर

खात्री आहे अशी मनोमन, नाही करणार आपण अव्हेर

(हे भाषण चालू असताना अल्सेस्त स्वत:च्याच तंद्रीत असावा, आणि ओरॉन्त आपल्याशी बोलतो आहे याची त्याला जाणीव नसावीसं वाटतं.)

अहो, आपल्यालाच आहे उद्देशून ही माझी याचना

अल्सेस्त:
मला?

ओरॉन्त:
होय, मी काही आगळीक तर केली नाही ना?

अल्सेस्त:
नाही नाही, पण मला हे सारं नव्हतं अपेक्षित
इतका गौरव व्हावा माझा, असं मी नाही मानीत

ओरॉन्त:
आपण मजला स्तुत्य असावे, यात अचंबा नाही काही
अशी योग्यता आपुली मोठी, दशदिशाही देतिल ग्वाही

अल्सेस्त:
अहो पण –

ओरॉन्त:
आपल्या अंगी लपल्या आहेत, गुणरत्नांच्या खाणी
कशी करू मी गणना त्यांची, अपुरी पडते माझी वाणी

अल्सेस्त:
अहो पण –

ओरॉन्त:
बहु असोत ऐसे मानव कितीही, ज्यांचा पोकळ डंका
आहा आपण चीज अनोखी, मजला नाही शंका

अल्सेस्त:
अहो पण –

ओरॉन्त:
शब्द यातला असेल खोटा, तर जाईन मी नरकात
मैत्र आपुले जोडु इच्छितो, द्यावा अपुला कोमल हात
सैरभैर हे झाले मन्मन, आता एकच धावा
मखमली हृदयात आपुल्या मजला मिळो विसावा
आस आहे या तडफडणाऱ्या याचकाला आता
फक्त आपल्या स्नेहाची –

अल्सेस्त:
अहो पण –

ओरॉन्त:
काय?! तुम्ही कचरता?

अल्सेस्त:
श्रीमन्, सन्मानाचे इतुके ओझे, आता मला न साहे
पण मैत्री ही वस्तू याहुनी, थोडी दुर्मिळ आहे
या शब्दाचे उपयोजन हे, करुया आपण संयत
उधळुन देता इकडे तिकडे, पडेल त्याची किंमत

पारख आणि विवेक यांचा, अशा प्रसंगी व्हावा संगम
सोयरीक ही करण्यापूर्वी, परिचय आधी होणे उत्तम
कुणी सांगावे स्वभाव अपुले नसतिल अगदी मिळतेजुळते
मागुनि नंतर वाटायाचे, न भेटणे उत्तम होते

ओरॉन्त:

आई शप्पथ! इतका शहाणा माणूस मिळणं फार बिकट
आपल्याबद्दलचा माझा आदर, झाला आहे शतपट
कालपरत्वे बळकट व्हाव्या ऋणानुबंधांच्या या गाठी
तोपर्यंत मी कंठिन जीवन फक्त आपुल्या सौख्यासाठी

जर क्वचित दरबारी, आपल्याला करणे असेल काही खटपट
तर कुणीही सांगेल तुम्हाला, राजाशी आहे माझी घसट
माझ्या अगदी खिशात आहेत त्याचे दोन्ही कान
माझा सल्ला घेतल्याखेरीज त्याचं हलत नाही पान
आपल्या प्रज्ञेच्या तेजाची, आहे अशी महती
प्रसंग काहीही असो, आम्ही आपले सांगाती

तेव्हा– आपल्या गोऽड स्नेहसंबंधांवर, व्हावं मंगलाचं सिंचन
म्हणूनच करू इच्छितो, मी नुकत्याच रचलेल्या, एका सुनीताचं वाचन
आपण ऐका आणि सांगा, देऊ का हे छापायला –

अल्सेस्त:
असल्या बाबतींत तुम्ही, नका घेऊ माझा सल्ला

ओरॉन्त:
का बुवा?

अल्सेस्त:
माझ्या अंगी, श्रीमन्, मुरला आहे एक विकार
नको तितक्या प्रामाणिकपणाची, खाज मला आहे फार

ओरॉन्त:
मला अगदी हेच पाहिजे! नपेक्षा मी केली असती तक्रार
जर जोखताना हा माझा उत्कट आविष्कार
केली असतीत प्रतारणा, किंवा काही दडवादडवी

अल्सेस्त:

असं असेल तर मी आहे तयार, जरूर म्हणा आपली कडवी

ओरॉन्त:
सुनीत. हे आहे एक सुनीत, नाव 'आशा'. विषय आहे एक तरुणी
की केवळ जिच्या आशेपोटी, जिवंत आहे माझी कहाणी

(मध्येमध्ये थांबून अल्सेस्तकडे पाहतो.)

'आशा'... इथे नाही दिसणार जडशीळ काव्यपंक्तींचे बाजुबंद
तर ही आहेत कवने इवलीशी, नाजुक, गोडसर आणि मंद

अल्सेस्त:
ते आपण बघूच –

ओरॉन्त:
'आशा'... कुणास ठाऊक काय पडेल तुमचा निर्वाळा
रुचेल का माझी शैली, आणि माझ्या शब्दकळा
येईल का तुम्हाला प्रत्यय, नितळ आणि आरस्पानी

अल्सेस्त:
ते पुढे कळेलच –

ओरॉन्त:
– आणि हेही आपण ठेवावं ध्यानी
की हे रचण्यासाठी, मी घेतली, फक्त एक घटका

अल्सेस्त:
ते काही असो, वेळेचा हिशेब इथे आहे लटका

ओरॉन्त (सुनीत म्हणू लागतो):
**हे खरं आहे, की आशा म्हणजे गारवा**
**ठसठसणाऱ्या वेदनेला, ती देते आराम थोडा**

**पण प्रिये, हा दिलासा आहे अगदी फसवा**
**जेव्हा संपते आशा, आणि उरतो रिकामा घडा**

फिलिन्त:
सुंदर! ही छोटीशी पेशकश, मला फारच आवडली

अल्सेस्त (खालच्या आवाजात):
काय?! ह्याला चांगलं म्हणताना, तुझी जीभ कशी नाही झडली?

ओरॉन्त:
**मला पाहून तू एकदा हसली होतीस अस्पष्ट**
**पण हवं होतंस घालायला, आपल्या औदार्यावर टोपण**
**आणि करायचेस कमी, थोडे स्वत:चेच कष्ट**
**जर करणार होतीस माझी, फक्त आशेवर बोळवण**

फिलिन्त:
अहाहा! शब्द आणि भावना यांची किती ही रम्य गुंफण

अल्सेस्त (खालच्या आवाजात):
शी! पाजी लाळघोट्या, ह्या भुशाची तू करतोस भलावण?

ओरॉन्त:
**जर मला पहावी लागली युगानयुगे वाट**
**तर माझ्या भावनेचा लोंढा होईल बेफाट**
**मग असेल मृत्यू हाच माझा साथीदार**
**तुझे कटाक्ष मला थांबवू शकणार नाहीत**
**कारण प्रियतमे, बुडतो माणूस निराशेच्या खाईत**
**जेव्हा फक्त उरते आशा अपरंपार**

फिलिन्त:
वाहवा! या कवितेच्या सांगतेत आहे सौंदर्य, प्रीती आणि ऋजुता

अल्सेस्त (खालच्या आवाजात):
नतद्रष्ट कवड्या, मसणात जावो ती सांगता
यापेक्षा बरी सांगता अशी की फुटतं तुझं नाक

फिलिन्त:
यापूर्वी मी नव्हता पाहिला, असा काव्यरसाचा परिपाक

अल्सेस्त:
आई ग!

ओरॉन्त:
तुम्ही मला चढवून ठेवताय! कदाचित तुमचा असा आहे होरा –

फिलिन्त:
छे छे! मुळीच नाही –

अल्सेस्त (खालच्या आवाजात):
मग दुसरं काय करतोयस तू? दगलखोरा –

ओरॉन्त (अल्सेस्तला उद्देशून):
पण श्रीमन्, तुम्ही नका विसरू आपला करार
नका राखून ठेवू काही, कळू द्यात आपले विचार

अल्सेस्त:
श्रीमन्, या बाबी असतात तशा फार नाजुक
आणि सोस असतो प्रत्येकाला, की आपलं व्हावं कौतुक

एकदा काय झालं, अशाच कायशा नावाचा, आहे एक माझा स्नेही
त्याच्या कविता वाचून मी म्हटलं, तुला धीर अगदी नाही
काहीबाही लिहिण्यासाठी जेव्हा सुटतो भारी कंड
तेव्हा चक्क आंघोळ कर घेऊन पाणी थंड
भरीस पडून करण्याआधी पांढऱ्यावर काळं

बेलगाम मनावर, फेक संयमाचं जाळं
चार लोकांत जे फोडतात आपल्या प्रज्ञेचा भोपळा
त्यांच्या प्रतिष्ठेवर फिरतो कुचेष्टेचा बोळा

ओरॉन्त:
म्हणजे एकूण तुमचा, असा आहे उपदेश
की माझी ही अपेक्षा अवाजवी –

अल्सेस्त:
छे छे छे! तसा नाही माझ्या बोलण्याचा उद्देश
मी त्याला म्हणालो की –
ज्यात नसेल ओलावा, ते लिखाण होतं निब्बर
आणि फक्त या दोषामुळे घसरतो त्याचा दर
असतील जरी गुण माणसामध्ये हजार
शेवटी त्याच्या न्यूनावरून होतो त्याचा विचार

ओरॉन्त:
तर मग तुमच्या मते, माझं काव्य आहे उणं

अल्सेस्त:
असं नाही म्हणत मी – पण बंद करण्यासाठी त्याचं लिहिणं
मी त्याला दाखवून दिलं, की हा काळ आहे मोठा बिकट
आणि या एका सोसामुळे, झालंय भल्याभल्यांचं तळपट

ओरॉन्त:
माझंही तसं आहे? माझ्या लिखाणात आहेत काही त्रुटी?

अल्सेस्त:
असं नाही म्हणत मी – पण मी त्याला बोललो शेवटी
की कशासाठी जुळवतोस ही यमकं सटरफटर?
आणि नंतर ती छापून घ्यायला, अडलंय तुझं खेटर
पोटासाठी लिहावं लागतं त्यांचा असेल निरुपाय

पण वाईट पुस्तक लिहिणाऱ्यांना दुसरी आणखी सबब काय?

तू माझं ऐक जरा, हा मोह आवरून धर
लोकांच्याही इच्छेचा आधी थोडा विचार कर
दरबारी तुला म्हणतात, शहाणासुरता माणूस
कुणीही काही म्हणो, तो लौकिक नको सोडूस
पाजी लोकांच्या नादानं जाईल सगळं वाया
तुझ्या पदरी येईल फक्त चेष्टा आणि दया
एवढं त्याला समजावण्याचा मी प्रयत्न केला

ओरॉन्त:
मला वाटतं तुमचा मतलब, माझ्या ध्यानी आला
पण माझा प्रश्न असा, की काय वाईट माझं सुनीत?

अल्सेस्त:
मी तुम्हाला स्पष्ट सांगतो, आधी जाऊ द्या ते चुलीत
तुमच्या भाषेला नाही सहजतेचा स्पर्श
हिणकस नमुन्यांचे, तुम्ही ठेवले आहेत आदर्श
हे काय हे **ठसठसणाऱ्या वेदनेला, ती देते आराम थोडा**
आणि **उरतो रिकामा घडा**
झालंच तर **कटाक्ष मला थांबवू शकणार नाहीत**
आणि हे **करणार होतीस आशेवर बोळवण**
आणि मग **बुडतो माणूस निराशेच्या खाईत**
**जेव्हा फक्त उरते आशा अपरंपार**
ह्या अप्रत्यक्ष शैलीची सध्या आहे चलती
पण आहे ती वास्तवात, कृत्रिम आणि सस्ती
हे आहेत फक्त नखरे, आणि शब्दांचा पिसारा
असं कधी बोलत नाही, मनापासून बोलणारा

आजच्या काळाची अभिरुची, मला आणते शिसारी
आपले पूर्वज गावंढळ असले, तरी त्यांना जाण होती खरी
मी तुम्हाला म्हणून दाखवतो, आता एक जुनं गाणं

आजच्या चालू कवड्यांमध्ये, हे एक अस्सल नाणं

**समजा राजानं दिली**
**मला पॅरिस नगरी**
**आणि वरून अट घातली**
**की सोड तुझी छोकरी**

**मी म्हणेन, राजा आं-री**
**मला नको तुझं पाऽरी**
**मला माझी छोकरीच प्यारी, हुर्रे!**
**मला माझी छोकरीच प्यारी**

रचना सरळ साधी आहे, आणि शैली थोडी जुनाट
पण भाव अगदी सच्चा आहे, आणि गोडी आहे अफाट
याउलट काय वर्णावी चालू कवींची मुक्ताफळं
रसिकता पळून गेली, आणि अभिरुचीनं केलं काळं

(स्वतःतच हरवलेला)

**समजा राजानं दिली**
**मला पॅरिस नगरी**
**आणि वरून अट घातली**
**की सोड तुझी छोकरी**

**मी म्हणेन, राजा आं-री**
**मला नको तुझं पाऽरी**
**मला माझी छोकरीच प्यारी, हुर्रे!**
**मला माझी छोकरीच प्यारी**

अगदी असंच म्हणेल, जो असेल खऱ्या प्रेमात
(फिलिन्तकडे पहात)
मग ज्यांना करायचीय थट्टा, त्यांना ती करू द्यात

बाकी जगात खूप आहे भुक्कड सगळा चोथा
पण अशा थोड्या गोष्टींबद्दल मला आहे आस्था

ओरॉन्त:
आणि मी म्हणतो, की माझी कविता आहे बावनकशी

अल्सेस्त:
ठीक. तुमची जी कारणं आहेत, ती असोत तुमच्यापाशी
पण एक गोष्ट उघड आहे; तुमची हरकत नसेल तर
मलाही माझी कारणं आहेत, जी राहतील समांतर

ओरॉन्त:
पण माझ्या अंगच्या प्रतिभेची, बाकी सारे देतात ग्वाही

अल्सेस्त:
कारण बाकी सारे बोलतात खोटं, मला ते जमत नाही

ओरॉन्त:
तुमचा असा समज आहे, की आपण करतो कोटीक्रम?!

अल्सेस्त:
तुमचं कौतुक केलं असतं, तर झाला असता तसा भ्रम

ओरॉन्त:
तुम्ही कौतुक नाही केलं, तरी माझं सहज भागेल

अल्सेस्त:
तुमची हरकत नसेल तर, तुम्हाला भागवून घ्यावं लागेल

ओरॉन्त:
माझी विनंती अशी: याच विषयावर आपणही करा एक रचना
आपली शैली काय आहे, याची मलाही येऊ दे कल्पना

अल्सेस्त:
न जाणो तुमच्याहीपेक्षा, वाईट असेल माझा खर्डा
पण इतकं मात्र मी बघेन, की बाकीच्यांना नको पीडा

(हळूहळू हमरीतुमरीवर येऊ लागतात.)

ओरॉन्त:
आवाजातून दिसतेय तुमच्या आढ्यतेची बाधा

अल्सेस्त:
तुम्हाला स्तुती हवी असेल, तर दुसरीकडे शोधा

ओरॉन्त:
ते सगळं ठीक भाऊ, पण तुमचा नक्षा आणा खालती

अल्सेस्त:
पण दादा, नक्षा कुठे ठेवायचा, हे आहे मला माहिती

(फिलिन्त दोघांमध्ये पडतो.)

फिलिन्त:
अरे अरे! बास झालं! जरा सांभाळून असा

ओरॉन्त:
चूक झाली माझीच, मी जातो इथून कसा –
येतो आता साहेब, माझी रुजू व्हावी सेवा

अल्सेस्त:
जरूर या, आणि आपला लोभ असू द्यावा

(ओरॉन्त तावातावाने निघून जातो.)

**प्रवेश तिसरा**

फिलिन्त:
सांगत होतो तरीही, बोललास उगीच स्पष्ट
गळयात बांधून घेतलंस, नको ते शुक्लकाष्ठ
हरभऱ्याच्या झाडावर ओरॉन्तला चढवायला –

अल्सेस्त:
माझ्याशी बोलू नकोस –

फिलिन्त:
पण –

अल्सेस्त:
माणसांचा सहवास, आता बास झाला

फिलिन्त:
हे फार होतंय –

अल्सेस्त:
माझा नाद सोड –

फिलिन्त:
पण मी –

अल्सेस्त:
एक शब्दही नकोय –

फिलिन्त:

पण झालं तरी –

अल्सेस्त:
मी काही ऐकत नाहीये –

फिलिन्त:
तरी पण –

अल्सेस्त:
पुन्हा?!

फिलिन्त:
पण अपमान –

अल्सेस्त:
मला बोलायला लावू नकोस, तेवढं सोडून काही माग

फिलिन्त:
मला झिडकारू पाहतोस? सोडत नाही तुझा माग!

(अल्सेस्त निघून जातो; आणि त्याच्यामागोमाग फिलिन्त.)

❉

## ❖ अंक दुसरा ❖

**प्रवेश पहिला**

(रंगमंचावर अल्सेस्त आणि सेलिमेन.)

अल्सेस्त:

मी आता थोडं, बोलू का स्पष्ट?
तुझ्या या वागण्यामुळे झालो आहे रुष्ट
राग आता आवरणं, होत चाललंय अवघड
साऱ्या माझ्या अंगाचा, होऊ लागलाय तिळपापड
तुला न सांगणं, ही ठरेल तुझी प्रतारणा
आपलं आता फाटणार, अशा दिसू लागल्यायत खुणा
'जमवून घेऊ कसंतरी', असं हजार वेळा म्हटलं जरी
मागे पडलीय आता, माझ्या सहनशक्तीची पायरी

सेलिमेन:

अच्छा! म्हणजे तू माझ्या मागे, आलास पाठोपाठी
ते माझ्याबरोबर भांडण करण्यासाठी

अल्सेस्त:

भांडण उकरून काढण्याचा नाही माझा हेतू
पण तुझं वागणं बघून, मनात आलाय किंतू
ही गोष्ट मला आता होत नाही सहन
तुझे चाहते झाले आहेत, पैशाला दोन डझन

सेलिमेन:

माझे चाहते खूप आहेत, म्हणून तू करणार माझा न्याय
पण लोकांना मी आवडते, याला माझा तो काय उपाय?

ते एवढा जीव टाकतात, मला भेटण्यासाठी
आणि तुझ्या मते त्यांच्यावर मी उगारावी काठी?

अल्सेस्त:
मी असं म्हणत नाही –
की कुणावर तू आणावंस काठी पडण्याचं संकट
पण तुझ्या हृदयाकडचा रस्ता, थोडा राहू द्यावास बिकट

मला माहीत आहे, की तुझं देखणं रूप, सोडत नाही तुझा पिच्छा
पण त्याला जे भुलतात, त्यांना अव्हेरण्याची, नसते तुझी इच्छा
घुसत असेल त्यांच्या हृदयात प्रथम तुझ्या सौंदर्याचा बाण
पण तुझ्या गोड वागण्यानंच शेवटी लागतं तिथे पांढरं निशाण
तुझा स्वभाव असा आहे, की अधिकच फुलतात त्यांच्या आशा
मग ते चिकटतात कायमचे, गुळावरच्या जणू माशा
तुझा सर्वांभूती स्नेहभाव, जर नसता इतका अथांग
तर चाहत्यांच्या ह्या गर्दीची, झाली असती पांगापांग

बाकीच्यांचं जाऊ दे –
पण मला सांग, की ही क्लितान्द्रनामक व्यक्ती
तुला आवडावी, अशी काय आहे तिची महती?
तू करावास त्याचा येता जाता आदरसत्कार
यामागे काय आहे त्याच्या गुणांचा आविष्कार?
त्यानं लांब वाढू दिलंय त्याच्या डाव्या करंगळीचं नख
ह्याचा अर्थ असा का, की त्याची बुद्धी आहे तल्लख?
ह्या छेलबटाऊ शहराप्रमाणेच, घेतलास का तूही निरोप
आपल्या अकलेचा, पाहून त्याचा देखणा सोनेरी टोप?
आवडले का तुला, त्याने गुडघ्याखाली लावलेले लेसचे ढिगारे?
की मोहवून गेले, त्याने पांघरलेले रंगीत रिबनींचे भारे?
की पाहून त्याने घातलेली जर्मन पद्धतीची घोळदार चड्डी
वाटू लागली तुला अचानक, कसलीशी अनन्वित गोडी?
की ऐकून त्याची छद्मी तारसप्तकातली हास्यास्पद पिरपीर
घुसला तुझ्या हृदयामध्ये अचानक मदनाचा तीर?

सेलिमेन:

विनाकारण नको रे करू त्याची निर्भर्त्सना
मी त्याला का सहन करते, हे तुला ठाऊक आहे ना?
मला एक आशा आहे, की त्याच्या ओळखीचे महाजन
माझ्या कज्ज्यात टाकतील माझ्या बाजूने वजन

अल्सेस्त:

मी म्हणतो बेलाशक गमाव तुझा कज्जा
पण माझ्या प्रतिस्पर्ध्याचा नको ठेवूस मुलाहिजा

सेलिमेन:

प्रत्येकच पुरुषावरती तू खाऊन असतोस खार

अल्सेस्त:

कारण प्रत्येकच पुरुषाला तू जवळ करतेस फार

सेलिमेन:

अरे! पण याचमुळे तुला, काळजीचं नसावं कारण
माझ्या स्नेहाची मी करत्येय चोहोबाजूंना पखरण
तुला वाटायला हवी होती थोडी वाढीव चिंता
जर माझ्यासंगे सदोदित एकच पुरुष असता

अल्सेस्त:

मी संशय घेतो इतरांवरून, असा तुझा दावा
पण इतरांपेक्षा मी कशा प्रकारे ठरतो उजवा?

सेलिमेन:

अशा प्रकारे, की फक्त तुझ्यावरच, आहे माझी प्रीती

अल्सेस्त:

पण हे खरं आहे, याची मी का धरावी निश्चिंती?

सेलिमेन:
पण माझी मीच तुला सांगते आहे आवर्जून
तरी तुझ्या मनामध्ये, का राहावी शंका अजून?

अल्सेस्त:
पण याचा काय भरवसा की वळताच माझी पाठ
तू आळवणार नाहीस, दुसऱ्यासमोर हाच पाठ?

सेलिमेन:
याआधी मी ऐकली नव्हती, इतकी सुंदर प्रेमयाचना
हितशत्रूंची काय गरज, असले प्रेमिक असताना?!

ठीक तर –
आता करून टाकते मी तुझ्या कुशंकांचा नायनाट
जे मी आधी बोलले, त्या साऱ्यावर मारते काट

आजपासून तुला कोणी फसवणार नाही, तुझ्या स्वत:व्यतिरिक्त

अल्सेस्त:
हे विधात्या! का आहे मी हिच्यावर इतका आसक्त?!
जर हिसकावून घेऊ शकलो मी, माझं हृदय, तिच्या हातून न फुटता
तर बाळगेन मी तुझ्याबद्दल, अनंतकाळाची कृतज्ञता

सेलिमेन, मी करीत असतो मरणान्ती तडफड
जेणेकरून शिथिल व्हावी तुझ्या जीवघेण्या प्रेमाची पकड
पण माझे सारे प्रयत्न ठरले आहेत फोल
तुझ्या प्रेमाच्या गर्तेत मी फसलो आहे खोल

सेलिमेन:
हे मात्र खरं, की जगात असला प्रेमी, दुसरा कुणी नसावा

अल्सेस्त:
हो! ह्या मुद्द्यावरून मी, धरीन जगाशी दावा

माझ्या हृदयातल्या प्रेमाला खरोखर नाही पाड
हा साराच प्रकार आहे शक्यतेच्या क्षितिजाआड

सेलिमेन:
प्रेम करायची तुझी, रीत मात्र आहे नामी
प्रेमापेक्षा प्रबळ आहे, वाद घालायची खुमखुमी
तुझं प्रेम व्यक्त होतं, सतत कडवट शब्दांनिशी
नसेल पाहिला कुणी प्रेमिक, तुझ्याइतका छिद्रान्वेषी

अल्सेस्त:
पण माझी कटुता संपावी, ही तुझीच खरी जबाबदारी
एकदाच आता मिटवून टाकू, साऱ्या वायफळ कुरबुरी
आपण एकमेकांशी जोवर –

---

**प्रवेश दुसरा**

(सेलिमेनचा नोकर बास्क येतो.)

सेलिमेन:
काय आहे?

बास्क:
मदाम, अकास्त भेटायला आला आहे –

सेलिमेन:
ठीक आहे, येऊ दे त्याला वर

(बास्क परत जातो.)

अल्सेस्त:
काय?! तुझ्यासह एकटं बोलणं, कधीच नाही का जमणार?
येईल त्याच्या भेटीला, तू आपली नेहमी तयार!

तू हे शिकून घे की कशी मारावी टांग
'मी घरी नाही,' असं नोकराकरवी सरळ सांग

सेलिमेन:
त्याचं मन मोडण्याची नाही माझी तयारी

अल्सेस्त:
इतरांच्याच मनाची तुला काळजी भारी

सेलिमेन:
सहजासहजी हा माणूस कधी नाही जात
खोटं बोलल्याचं कळलं तर धरून राहील दात

अल्सेस्त:
पण येऊच का देतेस तू त्याला घरी?

सेलिमेन:
अरे, तो वजन राखून आहे सरकारदरबारी
राजवाड्यात चालतात ज्या गुप्त खलबती
कशा कोण जाणे, त्या सगळ्या त्याला माहिती
प्रत्येक जागी असली माणसं खुपसून ठेवतात नाक
त्यांचा फायदा काही नसेल, पण असतो जबरी धाक

बाकीच्यांचा आधार जो मिळेल तो घ्यावा
पण असल्या माणसाबरोबर धरू नये दावा

अल्सेस्त:
एकूण काय, तर कुणाचंही असो कसंही वागणं
त्याला जवळ का घ्यावं, याची शोधणार तू कारणं
आणि शेवटी तात्पर्य –

**प्रवेश तिसरा**

(बास्क पुन्हा येतो.)

बास्क:

मदाम, क्लितान्द्र आला आहे –

अल्सेस्त (उठून जाऊ लागतो):

ह्यात काय आश्चर्य?!

सेलिमेन:

कुठे चाललास?

अल्सेस्त:

मी जातोय

सेलिमेन:

थांब

अल्सेस्त:

कशासाठी?

सेलिमेन:

थांब

अल्सेस्त:

मला ते शक्य नाही

सेलिमेन:

मी म्हणते म्हणून थांब

अल्सेस्त:

नको. आताशा उद्वेग आणतात मला ही संभाषणं

पण तरीही ती मी ऐकावीत, असं तुझं म्हणणं

सेलिमेन:
अरे खरंच नको जाऊस, थांब ना –

अल्सेस्त:
पण मला थांबायचं नसेल तर?

सेलिमेन:
मग जा! तुला वाटेल ते कर!

(अल्सेस्त अजून गेलेला नाही.)

---

**प्रवेश चौथा**
(एलिआन्त आणि फिलिन्त आत येतात.)

एलिआन्त (सेलिमेनला उद्देशून):
अगं, सांगितलं का कुणी तुला?
दोन मार्की आले आहेत आमच्याबरोबर –

(अकास्त आणि क्लितान्द्र आत येतात.)

सेलिमेन:
हो. (बास्कला उद्देशून) खुर्च्या आण बसायला
(अल्सेस्तला उद्देशून) तू गेला नाहीस अजून?

अल्सेस्त:
नाही; पण माझी मागणी अशी आहे, की अंग न चोरता
तुला ते हवेत की मी, हे जाहीर कर आत्ताच्या आत्ता

सेलिमेन:
जरा गप्प बस रे –

अल्सेस्त:
आजच्या आज तुझी निवड व्हायला हवी

सेलिमेन:
तुझं डोकं फिरलंय –

अल्सेस्त:
फार झाली ही टोलवाटोलवी

सेलिमेन:
आई ग!

अल्सेस्त:
तुला ठरवावं लागेल –

सेलिमेन:
बास झाली रे तुझी मस्करी

अल्सेस्त:
नाही, आणि फार वेळ थांबायची माझी नाही तयारी

क्लितान्द्र:
किल्ल्याजवळच्या बांधावर, मी ऊन खात होतो जरासं
आणि पाहतो तर क्लेऑन्तनं, करून घेतलंय स्वत:चं हसं
जरा बाजूला नेऊन, शिकवील चार शिष्टाचार
असा कुणी मित्र त्याला नाही का मिळणार?

सेलिमेन:
असल्या वागण्यामुळे त्याची, सदानकदा उडते खिल्ली
बघताक्षणीच कळून येतं की ही आहे एक वल्ली
तुम्ही त्याला पुन्हा पाहिलंत, आणि मध्ये पडला असेल खंड
तर पुन्हा नव्याने लक्षात येतो, ह्या माणसाचा विचित्र पिंड

अकास्त:
विचित्रपणाचीच जर आता निघाली आहेत बोलणी
तर तुम्हाला सांगतो, मला नुकताच भेटून गेला, एक वैतागशिरोमणी
मला उभा करून तासभर, तळपत्या उन्हात, माझ्या मेण्याशेजारी
कुठल्याशा अगम्य विषयावर, दमाँनं घेतली, माझी खरपूस हजेरी

सेलिमेन:
त्याच्या अंगी वसली आहे एक दुर्मीळ कला
मुद्द्याशिवाय तो बांधू शकतो, पोकळ शब्दांचा इमला
कान देऊन ऐकाल तुम्ही, जरी वाक्यन् वाक्य
नुसता गोंगाट ऐकू येतो, अर्थ समजणं अशक्य

एलिआन्त (हळू आवाजात फिलिन्तला):
मी म्हणते, ही सुरुवात काही वाईट नाही –
आणि याहीपुढे असेच जर का वाहत राहिले वारे
तर साऱ्या अनुपस्थित सज्जनांवर, झाडले जातील ताशेरे

क्लितान्द्र:
पण तिमान्त हा आहे एक वेगळाच नमुना

सेलिमेन:
डोक्यापासून पायापर्यंत एक गुपितच म्हणा ना!
बाजूने जाताना फिरवतो, तुमच्यावर तिरकस डोळे
क्षणाची उसंत नसते त्याला, पण काम काय करतो नकळे
काहीसुद्धा बोलताना, आक्रसून घेतो चेहरा
आणि सदोदित चघळत राहतो, गांभीर्याचा चिवट तोबरा
संभाषणात एकदम थांबून, करतो गर्भित स्मितहास्य
आणि कानात आपल्या कुजबुजतो, पण त्यात नसतं काहीच रहस्य
जे आहे चार चव्वल, ते त्याला वाटतं एक कोट
'तब्येत आता ठीक आहे', हा त्याला वाटतो गौप्यस्फोट

अकास्त:
आणि जेराल्द, मदाम?

सेलिमेन:
बापरे! काय वर्णावी त्याच्या त्या कंटाळकथांची गोडी
सरदारकीच्या गोष्टींनी ठासून भरलीय त्याची खोपडी
बडेजावी राहणीचं त्याला असतं हावरं कौतुक
राजकन्या काय म्हणते,  आणि काय करतो कुठला ड्यूक
हुद्दा अन् दर्जा यांचं, वेड त्याला बेसुमार
सतत आपले कुत्रे अन् घोडे अन् गाड्या दिमाखदार
मोठमोठ्या माणसांना करतो सरळ अरेतुरे
त्याच्या मते जुनाट असतात, सौजन्यानं वागणारे

क्लितान्द्र:
मी बेलीसबद्दल ऐकलंय, की त्याच्याबरोबर ती शिजवतेय काही डाळ

सेलिमेन:
पण ती बाई किती निरस, आणि तिचं बोलणं किती रटाळ!
ती मला भेटायला आली, की वाटतो बलिदानाचा प्रसंग
काय बोलावं आता हिच्याशी, म्हणून पछाडावं लागतं जंग
शब्द जे वापरते, त्यांत नसते कसलीच धुगधुगी
गरीब बिचारं संभाषण, मरून पडतं हरप्रसंगी
त्या बथ्थड शांततेविरुद्ध बोलण्यासाठी हल्ला
मी घालू पाहते हात, वाट्टेल त्या विषयाला
पाऊसपाणी, हवापाणी, वारा आणि थंडी
या साऱ्या विषयांची लागलीच वळते गठडी
एकूण तिची भेट म्हणजे छातीत भरते धडकी
मनात मी म्हणत राहते, 'बाई आता नीघ की'
मी आपली घड्याळ बघते, देते वीस जांभया
पण लाकडाच्या ओंडक्यासारखी, ही बसून राहते महामाया

अकास्त:
मदाम, तुम्हाला अद्रास्त कसा वाटतो?

सेलिमेन:
ओहोहो! नुसता पाहून घ्यावा त्याचा रुबाब!
स्वत:चा सहवास हीच त्याच्यासाठी शराब
दरबारात भागत नाही, त्याची मोठेपणाची तहान
कुरबुरी करत राहतो सदोदित लहानसहान
दुसऱ्या कुणाला मिळाला पैसा, सनद किंवा नोकरी
तर त्याला वाटतं आपल्यावर, अन्याय झाला महाजबरी

क्लितान्द्र:
तरण्याबांड क्लेऑंकडे, लोकांची सतत असते वर्णी
पण मदाम, तुमच्या मते कितपत आहे त्याच्यात पाणी?

सेलिमेन:
त्याच्याकडचा स्वयंपाकी, आहे मोठा निष्णात
फक्त पुख्खा झोडण्यासाठी, लोक त्याच्या घरी जातात

एलिआन्त:
त्याच्या घरच्या पंक्तीला, असतात उत्तमोत्तम पदार्थ

सेलिमेन:
पण पंक्तीला तोही असतो, हाच होतो मोठा अनर्थ
तो स्वत: म्हणजेच आहे, एक खराब पाककृती
आणि ती खावी लागल्यामुळे, बाकीच्याची होते माती

फिलिन्त:
पण बरंच वजन राखून आहे त्याचा काका दामी
मदाम, तो कसा वाटतो तुम्हाला –

सेलिमेन:
हो, त्याला पुष्कळदा भेटत असते मी

फिलिन्त:
मला तरी वाटला तो, शहाणासुरता आणि मवाळ

सेलिमेन:
हो, पण एकदा कोट्या करू लागला, म्हणजे सुटतो त्याचा ताळ
त्याचं बोलणं असतं कृत्रिम, आणि सूर असतो तिरका
सतत चतुर बोलण्यासाठी तो शोधत राहतो मोका

त्यानं एकदा डोक्यात घेतलंय, की आपण आहोत विचारवंत
तेव्हापासून त्याला, कुठलीच गोष्ट नसते पसंत
वाचत असतो सदानकदा, पण आवडत नाही कसलंच लिखाण
त्याच्या मते जो कौतुक करतो, त्याला नसते खरी जाण
जो दोष काढू शकतो, त्याचीच हुशारी राजमान्य
ज्यांना काही आवडतं, ते सारे अक्कलशून्य
नवीन नाटक आलं म्हणजे, याचा चेहरा होतो आंबट
'अहो काय एकेक होऊन गेले, ते जुन्या काळचे नट'

साध्यासुध्या बोलण्यात सुद्धा खोट काढतो पदोपदी
जे जे नाही तत्त्वचिंतन, ते ते त्याच्या मते रद्दी
दोन लुकड्या हातांची, घडी करतो छातीवर
डोळ्यांमध्ये भरतो करुणा, बघून खाली सगळे पामर

अकास्त:
वाहवा मदाम! आपण हुबेहूब चितारली आहे त्याची व्यक्तिरेखा

क्लिआन्त:
माणूस असा चिमटीत धरण्यात, दुसरा कोण आहे मदामसारखा?

अल्सेस्त:
करा अभिजनहो करा! करा लोकांना शिवीगाळी
कुणालाही सोडू नका, येऊ द्या प्रत्येकाची पाळी
पण इथे जर का आला, कोणीदेखील त्यांच्यापैकी
तर ये ये म्हणाल त्याला, पुढे होऊन तडकाफडकी

कराल त्याचं हस्तांदोलन, घ्याल त्याचं मधुर चुंबन
म्हणाल त्याला 'तुज सेवेने धन्य होवो अमुचं जीवन'

क्लितान्द्र:
पण आमच्यावर का घसरता? –
जर अशा संभाषणाला असेल तुमचा आक्षेप
तर तुम्ही मदामचा करायला हवा अधिक्षेप

अल्सेस्त:
नाही, कारण तुमच्या उत्तेजक हास्याचा फिसफिसाट
देतो तिला चिथावणी, जेणेकरून वाहू लागतात तिच्या टवाळगंगेचे पाट
ऐकून तुमच्या खुशामतीची कर्णकर्कश बोंब
अधिकच भडकतो तिच्या कुचेष्टेचा आगडोंब
तिच्या या कलादर्शनाचं, नसतं कुणी केलं कौतुक
तर तीही पुढच्या प्रयोगांना, राहिली नसती विशेष उत्सुक

आणि म्हणूनच, सर्वदूर घोंघावताहेत जे मानवी अनाचाराचे वारे
त्याला मी जबाबदार धरतो तुमच्यासारखे खुषमस्करे

फिलिन्त:
पण आपण बोललो त्या व्यक्तींचा, का यावा तुला पुळका?
ज्यांची इथे थट्टा झाली, त्यांवर तूही करशील तितकीच टीका

सेलिमेन:
अरे, पण सगळ्याचा विरोध, ही आहे त्याच्या हाडातली बीमारी
इतरांशी त्याचं मत जुळलं, असं कधी झालंय तरी?

त्याच्याकडे सोपवल्या आहेत ईश्वरानं, मतभेदरूपी बीजाच्या गोणी
त्यांची त्याला प्रत्येक जागी, करत राहिली पाहिजे पेरणी
बाकी लोकांचं म्हणणं, त्याला मान्य असतंच कधी?
आपलं मत उलटं पाहिजे, अशी त्याला जडलीय व्याधी
समजून चाल त्याला पटला, दुसऱ्या माणसाचा विचार
तर चारचौघांपेक्षा त्याला वेगळा कोण म्हणणार?

प्रतिवाद करण्यातच, त्याला वाटते मोठी गंमत
कित्येक वेळा तो असतो, स्वत:शीच असहमत
दुसऱ्या कुणी प्रकट केला, समज अगदी त्याचाच विचार
जिव्हारूपी तलवारीनं, लागलीच त्यावर करतो प्रहार

अल्सेस्त:
फिदीफिदी हसणारे घोळके, तुझ्यामागे आहेत या क्षणी
हीच तुला संधी आहे: घे करून माझी हेटाळणी

फिलिन्त:
पण हेही मात्र खरंच, की आहे तुझा तसा पिंड
जो कुणी जे बोलेल, त्याविरुद्ध तू करतोस बंड
तुझ्या साऱ्या वृत्तीतच, दडलंय काही अगम्य गुह्य
स्तुती असो वा निंदा, दोन्ही तुला होतात असह्य

अल्सेस्त:
माणसांबद्दल कटू बोलण्यात मी पडणार नाही उणा
कारण उणा कधी पडत नाही, माणसांचा मूर्खपणा
अभिप्राय द्यायचा म्हणजे, दोनच कप्पे सरसकट
कौतुक एकतर वारेमाप, नाहीतर निंदा अचकटविचकट

सेलिमेन:
पण –

अल्सेस्त (सेलिमेनला):
पण नाही! मरेपर्यंत मला नाही होणार सहन
तुला लागलेलं हे थिल्लरपणाचं व्यसन

(इतरांकडे पाहून)
आणि ज्या तुझ्या दोषांमुळे, तुझ्या चारित्र्याला येतो बाध
त्याच दोषांची भलावण, हा मी समजतो अपराध

क्लितान्द्र:
असं? मला नसतात छक्केपंजे, मी माणूस सरळसोट
पण मदाममध्ये दिसली नाही, मला अजून काही खोट

अकास्त:
मदाम चित्ताकर्षक आहेत, हे तर सर्वांनाच माहीत
पण त्यांच्या अंगचे दोष म्हणता, ते मला तरी दिसत नाहीत

अल्सेस्त:
डोळे असतील उघडे, तर त्यांना पडू नये विशेष ताण
आणि माझी टीका रास्त आहे, याची तिला आहे जाण

जिच्यावर असतं प्रेम, तिची करू नये व्याजस्तुती
असू नये रातांधळी, डोळस माणसाची प्रीती
असतो जर का मी एक, बुद्धिमती कुमारिका
तर मारला असता, असल्या तोंडपुज्यांच्या पार्श्वभागावर फटका
कारण माझ्या दोषांना जे देत नाहीत रास्त दूषण
ते सारे अप्रत्यक्षपणे, करीत राहतात त्यांचं पोषण

सेलिमेन:
तात्पर्य असं, की प्रेमिकांनी पाळला, जर का हा शिरस्ता
तर त्यांनी खरवडून काढायला हवी, हृदयातली सारी ऋजुता
आणि करीत राहायला हवा एकमेकांवर टीकेचा भडिमार
कारण आता हाच असेल, प्रणयाराधनाचा नवा शिष्टाचार

एलिआन्त:
असले नियम प्रेमिकांना वाटतात फार रुक्ष
त्यांना नेहमी कबूल असतो प्रेयसीचाच पक्ष
तिच्यामध्ये त्यांना कधी, आढळत नाही काही डावं
त्यांची मनोवृत्ती अशी, की सगळं आपलं छान दिसावं

जे जे असतं दोषास्पद, ते ते त्यांना वाटतं उजवं
त्याच्यासाठी सुंदर सुंदर, शोधून काढतात ते नावं

जी असते फिकट पांढरी, तिला म्हणतात चाफ्याची पाकळी
आणि जिला म्हणतात यामिनी, ती निघते भेसूर काळी
जी असते हडकुळी, तिला म्हणतात स्वच्छंदी
ठरते ती धीरगंभीर, जी असते लठ्ठ ऐदी
फलाणी दिसते बेताचीच, आणि देत नाही कपड्यांकडे लक्ष
तेव्हा प्रेमिकाला लगेच पटते, तिच्या विद्वत्तेची साक्ष
जी वाटते घमेंडखोर, तिला आहे स्वतंत्र बुद्धी
बेरकी ती चाणाक्ष, खुळी ती साधी
जी उंच, ती मानी
बुटकी, ती छोटेखानी
बडबडीला म्हणतात बोलघेवडी
अबोल तिला मनकवडी

आणि अशा प्रकारे, जसा वाढत जातो कामज्वर
तसतसे प्रेमिकेचे, सारेच दोष वाटतात सुंदर

अल्सेस्त:
पण तरी मला म्हणायचं असं की –

सेलिमेन:
सगळ्यांनी हा विषय आता ताबडतोब बंद करा
आणि चला आता गॅलरीमध्ये, मारून येऊ दोन चकरा

(अकास्त आणि क्लितान्द्रना)
काय, तुम्ही एवढ्यातच निघालात?

क्लितान्द्र आणि अकास्त:
नाही मदाम, आम्ही आहोत की इथेच

अल्सेस्त (सेलिमेनला):
ते गेले तर काय करावं, याचा तुला पडलाय पेच

(अकास्त आणि क्लितान्द्रना)
सज्जनहो, तुम्हाला हवं तेव्हा जाऊ शकता तुम्ही
पण तुम्ही जोवर जात नाही, तोवर इथेच असेन मीही

अकास्त:
जर मदामची गैरसोय होत नसेल तर
माझी तयारी आहे, इथे थांबायची दिवसभर

क्लितान्द्र:
राजा जाईल झोपायला, तेव्हा करावा लागेल त्याचा सरंजाम
पण तेवढं एक सोडलं, तर बाकी आज मला, नाही फारसं काम

सेलिमेन:
हा काहीतरी विनोद चाललाय –

अल्सेस्त:
तसं नाही अजिबात
आपण बघूया, की मीच जावं असं आहे का तुझ्या मनात

---

**प्रवेश पाचवा**
(बास्क येतो.)

बास्क (अल्सेस्तला उद्देशून):
सर, तुम्हाला शोधत आलाय, एक माणूस करडा
तो म्हणाला त्यांना सांगा, अन् ताबडतोब खाली धाडा

अल्सेस्त:
त्याला सांग, तुला इतकी घाई असेल तर –

बास्क:
त्याच्या जाकीटाला लावलीय सोन्याची जर

आणि रेशमाच्या गुंड्या –

सेलिमेन:
कशाला आलाय इथे हा शिपुर्डा?
ठीक आहे, येऊ दे त्याला –

(शिपाई आत येतो.)

अल्सेस्त:
अहो, पायधूळ इथेच झाडा!
काय काम आहे आपलं?

---

**प्रवेश सहावा**

शिपाई (अल्सेस्तला उद्देशून कुजबुजत):
सर, एक निरोप देण्यासाठी मागतो आपली परवानगी

अल्सेस्त:
मोठ्याने बोला हो, इथे काही नाही खाजगी

शिपाई:
फ्रान्सच्या दंडाधिकाऱ्यांशी राखतो मी इमान
तडकाफडकी हजर व्हा, असं आहे तुम्हाला फर्मान

अल्सेस्त:
कुणाला? मला?

शिपाई:
तुम्हालाच

अल्सेस्त:
मला बोलवायचं काय कारण?

फिलिन्त:
तू आणि ओरॉन्त यांच्यामधलं प्रकरण

सेलिमेन:
म्हणजे काय?

फिलिन्त:
ओरॉन्तच्या डोळ्यातून गळले अवमानाचे अश्रू
कारण अल्सेस्तनं केली त्याच्या कवितेची श्मश्रू
हा विनोदी वाद मिटवू पाहतायत, राजाचे अधिकारी

अल्सेस्त:
पण वाटेल ते कबूल करायची नाही माझी तयारी

फिलिन्त:
पण हुकूम तर मानावाच लागेल; चल आता –

अल्सेस्त:
पण आमच्यामध्ये ते कसा करणार समझौता?
हे अधिकारी काय असा काढणार फतवा
की जी कविता भिकार आहे, तिची मी करावी वाहवा?
जे मी एकदा म्हणालो, ते मागे का घेऊ?
तो खोटेपणा होईल –

फिलिन्त:
पण वापरायला हवे होतेस, शब्द आणखी थोडे मऊ

अल्सेस्त:
मी बधणार नाही, कारण ती कविता आहेच तसली भंकस

फिलिन्त:
मला वाटतं तू थोडं समजुतीनं घ्यावंस
चल आता –

अल्सेस्त:
मी येतो, पण अशी शक्ती नाही पृथ्वितलावर
की जी माझा निश्चय –

फिलिन्त:
हो चल आता, बडबड आवर

अल्सेस्त:
ज्या कवितेमुळे सुरू झालं हे सगळं सव्यापसव्य
तिला वाखाणण्याची राजाज्ञाच झाली, तर ते ठरेल माझं कर्तव्य
अन्यथा ती वाईट आहे असं घोकेन मी शेवटच्या श्वासापर्यंत
आणि म्हणेन, की ती रचणाऱ्याला दिलाच पाहिजे देहान्त

(अकास्त आणि क्लितान्द्र हसताहेत, त्यांना उद्देशून–)

सज्जनहो, खरोखर माझं बोलणं आहे इतकं मजेदार
हे मला नव्हतं ठाऊक –

सेलिमेन (अल्सेस्त आणि फिलिन्तना):
जाताना लोटून घ्या दार
जेव्हा जाल तेव्हा –

अल्सेस्त (सेलिमेनला):
मी जाऊन बघून येतो, काय म्हणताहेत राजाचे लवाद
परतल्यावर चालू ठेवू, आपण आपला जुनाच वाद

❋

## ❖ अंक तिसरा ❖

**प्रवेश पहिला**

(रंगमंचावर क्लितान्द्र आणि अकास्त.
स्थळ: सेलिमेनचं घर)

क्लितान्द्र:
मार्की, जेव्हा पाहावं तेव्हा, तुमचा मूड असतो झकास
तुम्हाला सगळी मौज वाटते, नाही कुठे कसला त्रास
पण कधीच कसं नाही उलटत, तुमच्या जीवनाचं तारू?
नीट विचार करून सांगा, उगीच धूळफेक नका करू!

अकास्त:
मार्की, जेव्हा मी आयुष्याचा थोडाफार विचार केला
तेव्हा म्हटलं स्वत:शी –
की चेहरा पाडून जगायचं, कारणच काय व्हायला?!

पैसा आहे, यौवन आहे, काळज्या काही नाहीत
चारचौघांत घराण्याचं नाव आहे माहीत
बापजाद्यांचं भक्कम वजन, टाकलं जर का दरबारी
तर मागेन तो हुद्दा, चालून येईल माझ्या दारी
दूरदूरच्या मोहिमांत गाजवलंय मी रणांगण
अशा शूर माणसाला नेहमी मिळतं मोठेपण
समाजातलं माझं स्थान, करण्यासाठी आणखी सिद्ध
निभाऊन नेलं आहे, मी परवाच एक द्वंद्वयुद्ध

चातुर्यानं बोलण्याची माझ्यात आहे हातोटी
फार विचार न करता, सहज सुचते मला कोटी

नवीन नाटक जोखण्यामधला, मी आहे विशेष दर्दी
माझ्या अभिप्रायावरून ठरतं, त्याला होणार कितपत गर्दी
कुणाची नक्कल चांगली वठली, अन् कुठे करायची वाहवा
हे सगळं तुम्ही माझ्या, नजरेवरून ठरवा

माझा चेहरा आहे लोभस, केस आहेत काळेशार
दात आहेत सरळ, आणि चाल मोठी रुबाबदार
शिवाय मी म्हणू शकतो, न करता आत्मश्लाघा
माझ्याइतके भारी कपडे, दुसऱ्या कुणाचे नाहीत बघा

पॅरिसमध्ये सगळीकडे, होतं माझं आगतस्वागत
स्त्रियांना मी आवडतो, अन् राजा ठेवतो माझी मुर्वत
माझ्यापाशी सगळं आहे, तेव्हा तुम्हीच आता सांगा मार्की
माझं काय चुकलं त्यात, मारली जर का फुशारकी?

क्लितान्द्र:
पण असं असेल –
तर कशासाठी इथे येऊन निश्वास सोडता पोकळ
जर गावत असेल शिकार इतर ठिकाणी बक्कळ?

अकास्त:
मी? ह्य! – जी बाई तडकाफडकी मला नाही फितत
तिचा गूळ काढत बसायला मला नसते फुरसत
असेही असतात काही बाप्ये, पुळचट आणि भिकारडे
जे आशाळभूत बघत राहतात अप्राप्य तरुणींकडे
लोळतात त्यांच्या पायाशी, झेलतात त्यांची हेटाळणी
उसासे टाकून करतात केविलवाणी विनवणी
जे मिळवण्यासाठी असते अंगभूत गुणांची त्रुटी
त्याचसाठी करत राहतात चिकटचेंगट खटपटी

पण मार्की, माझ्या जातीचे लोक, नाही धरत भोळसट प्रेमाची वाट
आणि नाही लागू देत बिलकुल, स्वत:च्या खिशाला चाट
स्त्रीच्या सौदर्याचं मोल मी कमी नाही लेखत

पण जगामध्ये माझीसुद्धा आहे काही किंमत
हवं असेल जर माझ्या हृदयावर स्वामित्वाचं नातं
तर तिलाही थोडं घ्यावं लागेल नमतं
प्रेमामध्ये दोघांचाही ठेवला जावा मान
दोन्ही बाजूंनी आकर्षण असलं पाहिजे समसमान

क्लितान्द्र:
एकूण, तुमच्या मते, तुम्ही आला आहात योग्य जागी

अकास्त:
तसं मत व्हायला मला कारणं आहेत खाजगी

क्लितान्द्र:
हं! मार्की, असं दिसतंय, की आत्मवंचना तुम्हाला जमते फार सहज
दूर करायला हवा मला तुमचा गोड गैरसमज

अकास्त:
मी आत्मवंचना करतो, आणि माझा गैरसमज आहे: अगदी अचूक आहे आपलं निदान

क्लितान्द्र:
पण का करीत असता सतत, आपल्या भाग्याचं गुणगान?

अकास्त:
कारण माझी आत्मवंचना!

क्लितान्द्र:
कशावर उभा आहे आपल्या आशेचा इमला?

अकास्त:
माझ्या गैरसमजावर!

क्लितान्द्र:
आहे का आपल्याकडे काही ठाम पुरावा दाखवायला?

अकास्त:
सांगितलं ना, मला भ्रम झाला आहे –

क्लितान्द्र:
– असं काही आहे का
की सेलिमेनबरोबर झाल्या आहेत, आपल्या गुप्त आणाभाका?

अकास्त:
नाही, मला ती वाईट वागवते –

क्लितान्द्र:
आम्हाला कळू तर द्या, गोष्ट काय ती खरीखुरी

अकास्त:
मला ती टाकून बोलते –

क्लितान्द्र:
अहो, आता सोडा ही मस्करी!
मला खरंच सांगा, इथे कितपत आहे तुम्हाला आशा?

अकास्त:
कसलं काय?! आमची सगळी निराशा, त्यापेक्षा तुमचीच बरी आहे ग्रहदशा
समोर देखील नको असतो, तिला माझा चेहरा
वाट पाहून एक दिवस मी खाणार आहे धतुरा

क्लितान्द्र:
छे, काहीतरीच –
मार्की, आपण दोघे एकमेकांशी उगीच स्पर्धा करणार
त्यापेक्षा आपल्याआपल्यात करूया का असा करार?
सेलिमेनच्या खिजगणतीत जो कोणी असेल उजवा
त्यानं जर पुढे आणला तसा स्पष्ट पुरावा
तर दुसऱ्यानं सोडून द्यावा आपला दावा अर्धा

आणि खतम करून टाकावी ही वैतागवाडी स्पर्धा

अकास्त:
वाहवा! मार्की, मला फार आवडला हा तुमचा शस्त्रसंधी
अट मला मान्य आहे, तेव्हा टाळी द्या आधी!
पण ही कोणाची चाहूल?

---

**प्रवेश दुसरा**
(सेलिमेन येते.)

सेलिमेन (दोघांना):
अजून इथेच?

क्लितान्द्र:
जखडून ठेवतेय आम्हाला आपल्या प्रेमाची बेडी

सेलिमेन:
खाली ऐकू येतेय एक घोडागाडी
कोणाची असेल, आहे काही माहिती?

क्लितान्द्र:
नाही –

---

**प्रवेश तिसरा**
(बास्क येतो.)

बास्क:
मदाम, आर्सिनोए मदाम
आपल्याला भेटू इच्छितात –

सेलिमेन:
या बाईचं माझ्याकडे काय काम?

बास्क:
एलिआन्त मदाम त्यांच्याशी बोलताहेत खाली

सेलिमेन:
ती कशाला इथे आली?

अकास्त:
बाईचा लौकिक असा, की ती आहे फार टीकाखोर
आणि तिच्या लुडबुडीमुळे –

सेलिमेन:
ह्य! – नुसता उसना जोर
आतून आहे ती चारचौघींसारखीच –
मादकपणे ताणूनताणून शरीरातल्या साऱ्या नसा
कसाबसा पकडू पाहते एखादा भेदरलेला ससा
आसुसून पाहते, तरुणींना वेढणारे प्रेमिकांचे गराडे
तिला वाटतं त्यांतला कोणी, चोरून पाहील आपल्याकडे
पण तिच्याकडे ढुंकून देखील पहात नाही कुत्रा काळा
तेव्हा सर्वांवरती टीका करणं हाच तिचा उरलाय चाळा

वरकरणी खाष्टपणाची उगारून पाहते काठी
भेडसावणारा एकटेपणा कसातरी वारण्यासाठी
सुकलेल्या सौंदर्याचं फुटू नये बिंग
म्हणून जे नाही आपल्यापाशी, त्यावर उगारते शिंग
खरं म्हणजे तिला हवाय, एक प्रियकर मस्त
तिच्या नजरेच्या टापूमध्ये सध्या आहे अल्सेस्त
तो येतो माझ्याकडे, याचं तिला दुःख भारी
तिच्या न्याय्य अधिकाराची, तिला ती वाटते चोरी
असूया लपवणं, नाही फारसं साधत तिला

जेव्हा जसा जमेल तेव्हा, घेऊ पाहते माझा बदला
खरोखर पाहिला नाही तिच्याइतका मूर्ख प्राणी
आडव्याउभ्या पॅरिसभर, म्हणतात तिला भोचकराणी

---

**प्रवेश चौथा**

(आर्सिनोए आत येते.)

सेलिमेन:
या! आज कसं काय माझ्याकडे येणं केलंत?
तुमच्या काळजीनं मला अन्न नव्हतं गोड लागत

आर्सिनोए:
सांगायला आले आहे उपदेशाचे शब्द चार

सेलिमेन:
असं! मग आपल्याला पाहून मला बरं वाटलं फार

(अकास्त आणि क्लितान्द्र हसत हसत निघून जातात.)

आर्सिनोए:
गेले ते बरंच झालं. जिथे तिथे कडमडतात उगीच –

सेलिमेन:
आपण बसूया का?

आर्सिनोए:
नाही, मी आपली राहते उभीच
मदाम, जेव्हा प्रश्न असतो जीवनविषयक दृष्टिकोणाचा
तेव्हाच याला महत्त्व असतं, की आपल्याला आधार कोणाचा

चारचौघात आपल्याबद्दल लोक काय बोलतात

याला फार मोल असतं बायकांच्या विश्वात
मी म्हटलं मैत्रिणीसमोर संकोच तो कशाला?
न बोलून मनातलं, अगदी राहवेना मला
माणसामाणसांत असायची मला आपली सवय
काल सहज बोलताना, निघाला तुमचा विषय
तुमचं वागणं बघून कुणी मुरडावीत नाकं
हे बघून माझं तरी गरम झालं डोकं
कसले कसले लोक, इथे करतात ये जा
कुणास ठाऊक मारतात, कसली कसली मजा
या सगळ्याबद्दल सगळे, बोलले बरंच काही
त्यांची तोंडं बंद करणं, मला काही जमलं नाही

मी तुमची बाजू घेतली, जितकी मला जमली तितकी
पण बाकीच्यांना किती पटली हे बरीक नाही नक्की
मी म्हटलं 'तिची थोडी कमी आहे समज
उत्साहाच्या भरात काही करून जाते सहज'
तुमच्या लौकिकाची काळजी मी करते जिवापाड
म्हणूनच काही गोष्टी होत नाहीत डोळ्याआड
शेवटी काय अर्थ आहे हे नाकारण्यात
की तुमच्या वागण्यानं गैरसमज होतात?
लोक आपलं शोधू लागतात दिसतं कुठे काळं
कुठवर आपण लावणार त्यांच्या जिभेला टाळं?
मी म्हणते का द्यावी, टीकाटिपणीला जागा?
त्यापेक्षा तुम्हीच थोड्या सांभाळून वागा

मी नाही म्हणत तुम्ही केलायत काही स्वैराचार
देवासाक्ष मनात माझ्या, नाही तसला काही विचार
पण लोक मात्र वाटेल तसं, बनवतात आपलं मत
आपण आपले बरे वागतो, असं म्हणून नाही भागत

तुम्ही मोठ्या सुजाण आहात, हे माहीत आहे मला
नका करू कानाआड माझा कळकळीचा सल्ला
माझा आपला एकच हेतू, आणि तो म्हणजे तुमचं हित

शंकासुद्धा घेऊ नका, की हिचं काही असेल इंगित

सेलिमेन:
मदाम, आपल्या या सल्ल्याबद्दल मी आहे आपली ऋणी
बघून आपली कळकळ, डोळ्यांत येतं पाणी
पण नका राहू कधी ऋणको, म्हणत असत माझे बाबा
तेव्हा परतफेड करून टाकते, आपण थोड्या इथेच थांबा

माझ्याविषयी कोणकोण कुठे करतं कसली कुजबूज
हे मला आपण सांगितलंत, आणि राखलीत मैत्रीची बूज
मी कशी वाया दवडू, इतकं सुंदर उदाहरण?
तेव्हा आपल्या मागोमाग, करते आपलं अनुकरण
मलादेखील भेटले होते असेच काही माझे स्नेही
माणसाबद्दल त्यांची पारख सहसा कधी चुकत नाही
'मनोवृत्ती कशी नसावी' यावर आमचा वाद झाला
एका स्नेह्याने तेव्हा दिला, 'मदाम आर्सिनोए'चा दाखला
आपला टीकाखोरपणा आणि आनंदपराङमुखता
हा सारा प्रकार त्याला बिलकुल रुचला नव्हता

डुढ्ढाचारी खाष्टपणाचा सदानकदा आव
शहाणपणाचे सल्ले, अन् पोक्तपणाचे भाव
उत्स्फूर्त शब्दांवर केलेले अवाजवी गहजब
वाकडे अर्थ शोधण्याचं आपलं बहुचर्चित कसब
सतत झुलीप्रमाणे पांघरलेलं गांभीर्य
इतरांवर कारुण्यमय कटाक्ष फेकण्याचं औदार्य
निष्पाप कृतींवर ओढलेले टीकेचे ताशेरे
सदोदित उडणारे नीतिबोधांचे फवारे
या साऱ्यावर त्यानं केली कडक टीका
मी स्पष्ट बोलते याचा राग मानू नका

सारे म्हणाले ही बाई, दिसते तशी सोज्वळ
पण तिच्या वागण्यामुळे उघडं पडतं तिचं पितळ
ईशस्तवन म्हणताना, उच्चारांवर कटाक्ष फार

पण बदडते नोकरांना, अन् देत नाही त्यांचा पगार
वरकरणी दाखवते की ईश्वरभक्तीत आहे दंग
पण पाहते सतत आरशात, फासून चेहऱ्याला रंग
तैलचित्रांतल्या नग्नतेवर मारते काळ्या फुल्या
पण मनातून मात्र तिला, होत असतात गुदगुल्या

आता मीदेखील तुमचा जमला तेवढा केला बचाव
म्हटलं त्यांच्या बदनामीचा हा सारा आहे डाव
पण आपले दोष उघड आहेत, बाकीच्यांच्या मते
तेव्हा एवढ्या सगळ्यांसमोर मी काय बोलणार होते?

तुम्ही थोडी कमी करावी इतरांची परीक्षणं
अन् स्वत:कडे लक्ष द्यावं असं पडलं त्यांचं म्हणणं
आधी काढावं स्वत:च्या कानातलं लाकूड
मग शोधावं इतरांच्या नाकातलं मेकूड
इतर लोकांची आयुष्यं दुरुस्त करण्यापूर्वी
खुद्द आपण कसे वागतो याची जाण हवी
माणसांना सुधारण्याची नका घेऊ तसदी
त्या कामी पोपमहाराज उबवताहेत गादी

तुम्ही मोठ्या सुजाण आहात, हे माहीत आहे मला
नका करू कानाआड माझा कळकळीचा सल्ला
माझा आपला एकच हेतू, आणि तो म्हणजे तुमचं हित
शंकासुद्धा घेऊ नका, की हिचं काही असेल इंगित

आर्सिनोए:
सल्ला देताना मी धोका पत्करला हे खरं
पण मला अपेक्षित नव्हती, ही असली प्रत्युत्तरं
तुमच्या नाकाचा शेंडा, आणि शिरांमधला ताण
यावरून असं दिसतंय, की नेमका लागलाय माझा बाण

सेलिमेन:
मदाम, तसं अगदी नाही. जर मैत्रिण असेल सच्ची

तर उपदेशाची ही देवाणघेवाण तशी नेहमीच चालायची
प्रत्येकाचीच स्वत:बद्दल मतं असतात भ्रामक
त्यावर नेमकं लागू पडतं हे उपदेशाचं रेचक

आता हा निर्णय, मदाम, आहे केवळ आपल्या हाती
की हे परस्परसहकार्य करायचं, तर कसं आणि किती
कुठपर्यंत पुढे न्यायची, ही मैत्रिणीमैत्रिणीतली खलबतं
आणि सांगायचं एकमेकींना, की दुसरीबद्दल आपल्या, कायकाय कानी पडतं

आर्सिनोए:
मदाम, तुमच्याविरुद्ध कधीसुद्धा बोलत नाही कोणी
उलट मलाच आपली नेहमी, ऐकावी लागतात बोलणी

सेलिमेन:
मदाम, रुची आणि वयामुळे, बदलतात माणसांच्या धारणा
जे एकाला आवडतं, त्याची दुसऱ्याला वाटते घृणा
आयुष्यात एक टप्पा असतो, करण्याकरता प्रणयाचे खेळ
पण मग काही वर्षांनंतर, येते नाकं मुरडण्याची वेळ
यौवनातल्या शरीराला जेव्हा लागते उतरण
तेव्हा अंमलात आणावं, हे नाकं मुरडण्याचं धोरण
लपवता येते त्यायोगे, वयोमानानं झालेली पडझड
न जाणो करावी लागेल, पुढे मलाही तीच निवड

ते असो. म्हातारपणी पाडता येईल या गोष्टींचा कीस
आज कशाला घेऊ संन्यास, माझं वय असता वीस?

आर्सिनोए:
एवढ्याशा गोष्टीवरून नका फुशारू इतक्या
आपल्या तारुण्याच्या भारीच मारताय टिमक्या
असेल सुद्धा वय माझं, थोडं बरीक जास्त
पण सतत त्याचा विषय काढणं, नाही वाटत प्रशस्त
मदाम, मघापासून एका बाबीचा मी करते आहे खल
तुमच्या मनात माझ्याबद्दल का असावा सल

सेलिमेन:

आणि मदाम, तुम्हीही एक गोष्ट, स्पष्ट करा एकदा
जिथे जाता तिथे, का करता माझी निंदा?
तुम्ही जीवनात निराश आहात, म्हणून माझ्यावर का खार खाता?
तुम्हाला प्रियकर शोधण्याचा, मी कधी घेतलाय मक्ता?

जर माझ्या रूपावर भाळत असतील पुरुष
आणि माझ्या स्वभावावर होत असतील खूष
आणि घालत असतील रुंजी माझ्याभोवती, की जिचा तुम्हाला वाटतो हेवा
तर हा प्रश्न, मदाम, तुमचा तुम्हालाच सोडवायला हवा
रान आहे पूर्ण मोकळं, शिकार साधण्यासाठी
हवे तितके प्रियकर मिळवा, माझी नाही आडकाठी

आर्सिनोए:

हट! तुम्हाला असं वाटतं का, की घेईन मी तसदी
गोळा करण्याकरता असल्या फालतू प्रेमिकांची गर्दी
अलिकडे हे सांगणं अवघड झालंय जाम
त्यांच्यापैकी कुणासाठी कोणता मोजलाय दाम
तुमचं म्हणणं असं की फक्त तुमच्या गुणांमुळे
येऊन आपले चिकटतात तुम्हाला हे डोंगळे
खेचून घेते त्यांना तुमची शुद्ध प्रतिभा
आणि मग तुमच्या घरी, दाटीनं भरवतात सभा
असली सोंगं आता चालत नाहीत फार
चहूकडे लोक आता झालेत फार हुशार

मला स्वत:ला ठाऊक आहेत, अशा कित्येक तरुणी
की ज्या आहेत देखण्या, पण त्यांना नाही प्रियकर कोणी
आणि म्हणूनच या तर्काबद्दल, नाही आता काही दुमत
की प्रेमिक जमा करण्यासाठी, द्यावी लागते जबरी किंमत
त्याच्यासाठी पुरेसे नसतात, केवळ आपले नेत्रकटाक्ष
त्यांनी केलेली खुशामत कधीही नसते निरपेक्ष
तेव्हा फुशारक्या मारण्यात नका घालवू शक्ती वाया

की आपण जिंकल्या आहेत बारीक सारीक लढाया
आपल्या दिसण्याचं कौतुक आता थोडं आवरा
आणि नका करीत जाऊ इतरांचा पाणउतारा

मला जर असतं, असल्या आयुष्याचं आकर्षण
तर मीही केलं असतं, इतरेजनांचं अनुकरण
बेलगाम वागले असते, आणि दिली असती सिद्धता
की मला प्रेमिक हवेच असते, तर त्यांना काही तोटा नव्हता

सेलिमेन:
तसं असेल तर मदाम, मिळवा निदान एक जण
कळू दे तरी आम्हाला, तुमच्यातलं सुप्त आकर्षण
आणि जर –

आर्सिनोए:
मदाम, मला वाटतं हे संभाषण इथेच आवरतं घ्यावं
कारण अन्यथा तुटेल, तुमच्या माझ्या संयमाचं दावं
सुदैवानं खोळंबली आहे, वाटेत माझी घोडागाडी
नाहीतर आपल्या सहवासाची, लांबली नसती इतकी गोडी

सेलिमेन:
मदाम, जरूर घ्या आपण वेळ, आपल्याला हवा तितका
मी तुम्हाला जायला सांगतेय, असं अगदी समजू नका
पण आपल्याला होऊ नये, माझा सहवास कंटाळवाणा
म्हणून देतेय आपल्या सोबतीला, हा दुसरा एक पाहुणा
अगदी वेळेवर आले आहेत, हे एक गृहस्थ सज्जन
माझ्यापेक्षा बरं करतील ते आपलं मनोरंजन

(अल्सेस्त येतो.)
अल्सेस्त, मला लिहावं लागणार आहे तातडीने एक पत्र
नाहीतर माझ्यावर रुसेल, माझा एक खास मित्र
मदामबरोबर गप्पा मार, नको वागूस उगीच व्रात्य
मी जातेय, पण त्या नक्की माफ करतील, माझं हे औद्धत्य

(सेलिमेन जाते.)

---

**प्रवेश पाचवा**

आर्सिनोए:
तिचा एकूण रोख असा, की मी घोडागाडीची वाट पाहता पाहता
बसावं इथे तुमच्यापाशी, आणि कराव्यात हवापाण्याच्या वार्ता
असा योग आणल्याबद्दल, मी मानले असते तिचे आभार
जर मला माहीत नसतं, की ती करते माझा तिरस्कार

ज्यांच्या अंगी झळाळते प्रतिभेची दीप्ती
आपणहूनच प्रेम करतात सारे त्यांच्यावरती
आपल्यामध्ये मला दिसते अशी सुप्त किमया
की अंगावर घ्यावीशी वाटते आपल्या सहवासाची छाया

मला वाटतं तुमची जागा, आहे राजाच्या दरबारी
ओळखावी त्यानं तुमची चमक, आणि बहाल करावी मोठी चाकरी
तुम्ही खरोखर तक्रार करावी, अशीच आहे परिस्थिती
पारख न झाल्यामुळे तुमच्या गुणांची होतेय माती

अल्सेस्त:
मी?! पण मदाम, कशाच्या जोरावर मी असला हक्क सांगावा?
अशी काय घडली आहे माझ्या हातून देशसेवा?
कशासाठी मी करावी दरबाराविषयी तक्रार?
असा काय दाखवलाय मी अकलेचा चमत्कार?

आर्सिनोए:
आत्तापर्यंत दरबारी ज्यांचा झालाय गवगवा
हे खरं नाही सर्वांबद्दल, की त्यांनी केलीय काही सेवा
सेवा करण्यासाठी निदान, तशी संधी तरी हवी
आणि आपल्या गुणांची दखल घेतली जावी

म्हणूनच –

अल्सेस्त:
अहो, आता बास करा माझ्या गुणांचं हे गाणं
दरबारानं काय करावं असं तुमचं म्हणणं?
आत्तासुद्धा त्यांच्या माथी कामं असतात वारेमाप
प्रत्येकाचं गुण शोधणं म्हणजे केवढातरी वाढेल व्याप

आर्सिनोए:
पण गुणच तसे प्रखर असले, तर आपणहून लक्षात येतात
अहो, तुमच्याबद्दल, खूप चर्चा चालते शहरात
असे दोन बडे लोक, की ज्यांच्या ओळखी आहेत हजार
कालच म्हणत होते, की हा माणूस मोठा होणार

अल्सेस्त:
आजकाल प्रत्येकाचाच चढला आहे भाव
कशाची जर कमी असेल तर तो म्हणजे तरतमभाव
आजकाल प्रत्येकाचीच स्तुती होते तोंडफाड
सरसकट एरंडाला सगळेजण म्हणतात माड
हंस म्हणून वावरतोय एकन् एक डुक्कर
गॅझेटात झळकलाय, कालच माझा नोकर

आर्सिनोए:
मला आपलं असं वाटतं, की तुम्ही प्रकाशात यावं थोडं
पण दरबारच्या चाकरीचं, का तुम्हाला इतकं वावडं?
माझ्या वतीनं मी करेन, जे जे आहे मला शक्य
तुम्हाला त्यात रस आहे, असं म्हणा फक्त एक वाक्य
योग्य त्या यंत्रणेला, मारली योग्य जागी चावी
की तुमची पुढची मजल, अगदी सोपी होऊन जावी

अल्सेस्त:
अहो, पण एकदा तिथे पोहोचल्यानंतर, मजल होईल फारच बिकट
माझ्यासारख्या माणसाची, तिथे होईल फक्त घुसमट

निसर्गानंच माझी, अशी केलीय जडणघडण
की दरबारी खाक्याची, त्यात आहे अंमळ चणचण
असली पदं सांभाळायला अंगी लागतात काही कळा
त्या मानानं माझा स्वभाव तसा आहे फार भोळा
प्रामाणिक आणि स्पष्टवक्ता, माझी ओळख हीच खरी
मला कधी जमली नाही, आडून बोलण्यातली हुशारी
दरबारातल्या माणसानं, ठेवली पाहिजे हसरी छबी
अंगी बाळगली पाहिजे, मन झाकण्याची खुबी

जो माणूस दरबाऱ्यांचा नाही राखत आब
त्याला कदाचित मिळत नसतील, चकचकणारे पितळी किताब
पण तरीदेखील त्याला हा दिलासा असतो, की
नाही करावी लागत सदानकदा विदूषकी
नाही प्राशन करावं लागत, शेकडो अवमानांचं पंचगव्य
आणि नाही प्रशंसावं लागत, श्रीमान अमुकढमुक यांचं काव्य
नाही पुरवावे लागत, मदाम द बेकलाएत यांचे डोहाळे
आणि नाही सहन करावे लागत, कोण्या चक्रम मार्कीचे चाळे

आर्सिनोए:
तुम्ही म्हणताय, तर राहू दे तो दरबारचा विषय
पण मला भारी वाईट वाटतं, पाहून तुमचा प्रणय
माझ्या मनीची खळबळ, कळत नाही कशी आवरू
तुम्ही दुसरीकडे वळवावं, तुमच्या प्रेमाचं तारू
नपेक्षा निराशेत होईल, तुमच्या भावनांची परिणती
कारण ती तुम्हाला लायक नाही, जिच्यावर तुमची आहे प्रीती

अल्सेस्त:
मदाम, या आपल्या सल्ल्याची, मी नाकारीत नाही उपयुक्तता
पण ती तुमची मैत्रिण आहे, हे आपण कशा विसरता?

आर्सिनोए:
मान्य. पण पाहून आपली होणारी अवहेलना
माझ्या मनाला आता अगदी राहवेना

तुमची ही स्थिती पाहून, तडफड होते खोलवर आत
कारण तुमची प्रेयसी, करतेय तुमचा विश्वासघात

अल्सेस्त:
खरंच मदाम, आपण सदोदित करता, माझ्या हिताचाच विचार
ही माहिती मला देऊन, आपण केले आहेत मोठे उपकार

आर्सिनोए:
माझ्या जिवाभावाची मैत्रिण जरी असली सेलिमेन
तरी तुम्हाला ती योग्य नाही, असं मी निक्षून म्हणेन
तुमच्यावरचं तिचं प्रेम, म्हणजे निव्वळ बनवाबनवी

अल्सेस्त:
तसं असूही शकेल मदाम –
हृदयातली खरी गोष्ट कुणाला कशी कळावी?
पण जर आपल्या मनात होती, केवळ परोपकाराची भूमिका
तर का भरलीत माझ्या मनात, आपण अशी कुशंका?

आर्सिनोए:
जर नको असेल तुम्हाला खरा प्रकार कळायला
तर तसं सांगा, म्हणजे तो विषय, आत्ता बंद झाला

अल्सेस्त:
तसं नाही, पण हा विषय आता आलाच आहे उघड्यावर
तर संशयात राहण्यापेक्षा, सगळं कळणंच श्रेयस्कर
ज्यांच्यामागे दाखवता येईल, ठाम पुराव्यांची मालिका
अशाच गोष्टी मला सांगा, बाकी काही सांगू नका

आर्सिनोए:
उत्तम! मी तुम्हाला खात्री देते, की यथावकाश
ह्या साऱ्या प्रकारावर मी पाडून दाखवीन प्रकाश
अस्से जाऊ माझ्या घरी, हात माझा घट्ट पकडा
डोळ्यांसमोर आणत्ये तुमच्या, बित्तंबातमी खडानखडा

तुमची प्रेमिका, काय करते तुमच्या अपरोक्ष
याचा सरळ पुरावाच, मी देईन तुम्हाला प्रत्यक्ष

आणि त्यानंतर तुम्हाला वाटलं, की संपली आपली प्रेमकथा
तर तुमचं सांत्वन करण्यासाठी, मी करू शकेन काही व्यवस्था



## ❖ अंक चौथा ❖

### प्रवेश पहिला

(रंगमंचावर एलिआन्त आणि फिलिन्त.)

फिलिन्त:

यापूर्वी पाहिला नव्हता, माणूस कधी इतका हेकट
असं भांडण झालं नव्हतं, मिटवायला जे इतकं बिकट
सगळ्यांनी सगळीकडून, समजावून पाहिलं त्याला
हा आपला पठ्ठ्या मात्र, दगडासारखा ढिम्म राहिला
रडकुंडीला आले अगदी, राजाचे अधिकारी
हा असला तंटा त्यांच्या, बापालाही असेल भारी

"शब्द मागे नाही घेणार," आपला नायक ठासून बोलला
"एवढा एक मुद्दा सोडून, मी राजी आहे तडजोडीला
जे काही बोललो मी, त्याचा का यावा राग?
चांगलं लिहिता न येण्यात, प्रतिष्ठेचा काय भाग?
त्यानं अपमान वाटून घ्यावा, याला माझा काय उपाय?
वाईट कविता केली म्हणजे, माणूस वाईट असं कुठाय?

त्याच्या फक्त लिखाणावर, मी केली किंचित टीका
पण बाकी त्याच्या अब्रूला, नाही कुठे लावला धक्का
'हा माणूस आहे शूर, आहे चतुर, आहे गुणरत्नांचं भांडार'
म्हणाल त्याला हो म्हणतो, पण कवी म्हणून अगदी भिकार
त्याचा पैसा, त्याची तलवार, घोड्यावरच्या कसरती
ह्या साऱ्याची म्हणाल तर, वाट्टेल तेवढी करतो स्तुती

पण स्तुती करायची कवितेची, तर मला आपली रजा द्या
इतकं मात्र उघड आहे, की त्याच्याकडे ती नाही विद्या

पद्यरचना करण्यासाठी अभिरुची पक्की हवी
करून भागत नाही नुस्ती, यमकांची जुळवाजुळवी"

शेवटी केली दोघांनी, थातुरमातुर तडजोड
ह्यानं काढला आवाज, त्याच्या मते गोड
"भाषेबद्दल माझी मतं, आहेत फारच ठाशीव
सर्वांना ती रुचत नाहीत, याची आहे मला जाणीव
तुमच्या कवितेबद्दल आहेत, आपले प्रामाणिक मतभेद
ती मला नाही आवडली, याचा मनापासून होतो खेद"

मारायला लावली मिठी, दोघांना करून दादापुता
आणि या प्रसंगाची, झाली अशी ही सांगता

एलिआन्त:
तो थोडा चक्रम आहे, यात तशी शंका नाही
पण लक्ष वेधून घेतलं जावं, असं त्याच्यात आहे काही
वरवर वाटतो हा माणूस, प्रमाणाबाहेर स्पष्टवक्ता
पण मला दिसते त्याच्यामध्ये, एक प्रकारची उदात्तता
अलीकडे हा गुण, कुठेच दिसत नाही फार
तेव्हा आणखी थोडा पसरला, तर माझी तरी नसेल तक्रार

फिलिन्त:
पण मी त्याला जितकं पाहतो, तितका मला वाटतो अचंबा
अतिरेकी आग्रहानं, त्याच्या मनाचा घेतलाय ताबा

ह्या माणसाचा स्वभाव, म्हणजे निसर्गाच्या विनोदबुद्धीची ग्वाही
हा प्रेमात पडलाच कसा, तेच मला कळत नाही
राहून राहून विचार करून, डोक्याला येतो भारी शीण
त्याची प्रेमवस्तू ती कोण?! तर नेमकी तुझी मामेबहिण!

एलिआन्त:
भल्याभल्यांना कळली नाही कामाच्या कामाची रीत
प्रेम निर्माण होण्यासाठी, स्वभाव जुळावे लागत नाहीत

'समानशीलव्यसनेषु प्रीती' असं जर का कुणी म्हणाला
तर खंडनाला पुरे व्हावा, एवढा एकुलता एक दाखला!

फिलिन्त:
प्रतिसाद मिळतोय त्याच्या प्रेमाला, असं तुला वाटतं का?

एलिआन्त:
ह्या मुद्द्यावरून मात्र, माझ्या मनात आहेत शंका
पण शहाणपणा यातच आहे, की तिऱ्हाइतानं रहावं मूक
कारण स्वत:ला काय हवंय, हे तिचं तिलाच नाही ठाऊक

काही वेळा, आपण आहोत प्रेमात हे तिलाच नसतं माहिती
तर काही वेळा, आपण आहोत प्रेमात असं उगीचच समजते ती

फिलिन्त:
आपण कशात गुंतलो आहोत, याचा त्याला नाही अदमास
घशात त्याच्या अडकणार आहे, या प्रेमप्रकरणाचा घास
त्याचं प्रेम आहे अफाट, पण ती त्याला नाही पात्र
स्वत:च्याच भल्यासाठी, त्यानं नजर वळवावी इतरत्र
जे त्याला मिळणार नाही, त्याचा सोडून द्यावा पिच्छा
मदाम एलिआन्त, तुम्हाला तो हो म्हणो, हीच आहे माझी इच्छा

एलिआन्त:
अशा बाबतीत मला, आवडत नाही लपवालपवी
मनातली खरी गोष्ट, आपण आपली उघड करावी
त्याच्या प्रेमप्रकरणात मी घालणार नाही खोडा
मला नाही वाईट वाटणार, जमला जर हा जोडा
या प्रकरणाची सूत्रं, जर असती माझ्या हाती
तर त्यांचं मीलन होण्यासाठी, मी शिकस्त केली असती
पण समजा नाही झालं, शेवटी त्याच्या मनासारखं
आणि तिच्या प्रेमाला त्याला व्हावं लागलं पारखं
समजा तिनं निवडला दुसरा कुणी त्याच्याऐवजी
तर त्याचा अर्थ हा नव्हे, की माझी होईल इतराजी

दुसरीला तो नको आहे, केवळ या कारणासाठी
कपाळावर निष्कारण मी आणणार नाही आठी

फिलिन्त:
आणि मदाम, यासाठी मी तुम्हाला शुभेच्छा देतो
माझ्याकडून प्रयत्न करीन जो तुम्ही म्हणाल तो
या बाबतीत मी त्याला, जो काही सल्ला दिला
त्याची जर मर्जी असेल, तर तोच सांगेल तुम्हाला

पण समजून चाला, त्या दोघांची खरोखर झाली युती
आणि परिणामी कदाचित, आली निराशा आपल्या हाती
तर ज्या भावनांनी, केली आपली निराशा
त्यांची जर आपण पालटू शकलात दिशा
आणि जर करू शकलात त्याच्याजागी माझा विचार
तर माझ्या आनंदाला नाही उरणार पारावार

एलिआन्त:
तू थट्टा करतोयस, फिलिन्त –

फिलिन्त:
– मदाम, तसं नका समजू
मी उघड केली आहे, माझ्या मनाची हळवी बाजू
वाट पाहीन मी त्या क्षणाची, डोळ्यांत आणून पाणी
न कचरता घालू शकेन, जेव्हा मी तुम्हाला मागणी

---

**प्रवेश दुसरा**
(अल्सेस्त येतो.)

अल्सेस्त (एलिआन्तला उद्देशून):
ह्या असह्य वेदनांनी मी झालो आहे कसनुसा
देशील का थोडा माझ्या मनाला दिलासा?

एलिआन्त:

पण इतकं उद्विग्न होण्यासारखं आहे काय कारण?

अल्सेस्त:

अशी एक गोष्ट, की जिची आठवण म्हणजेच मरण
जरी उद्ध्वस्त झाली असती सारी निसर्गसृष्टी
तरीदेखील माझं मन नसतं झालं इतकं कष्टी
माझं प्रेम संपलं – काय बोलू मी!? बंद झाली माझी वाचा

एलिआन्त:

अरे, पण थोडा हिय्या कर मनाचा

अल्सेस्त:

जगात आहे जे जे हिणकस, कपटी आणि खोटं
केलं असेल का त्यानं अलौकिक सौंदर्याशी साटंलोटं?

एलिआन्त:

पण नक्की झालं तरी काय?

अल्सेस्त:

– सगळा अनर्थ झाला
माझ्या आयुष्यावर पडला आहे घाला
मला नाही वाटत आता मी फार जगेन
कारण माझ्याशी बदफैली करते आहे सेलिमेन

एलिआन्त:

तसा पुरावा आहे तुझ्याकडे, की नुसताच संशयकल्लोळ?

फिलिन्त:

असूही शकेल कदाचित हे अस्पष्ट शंकेचं झाकोळ
बारीकसारीक गोष्टींचा तू करत असशील बाऊ

अल्सेस्त:

हे बघ! माझ्या भानगडींत तू लक्ष नको देऊ
तिच्या प्रतारणेबद्दल मला शंका नाही तिळमात्र
कारण माझ्या खिशात आहे, तिच्या अक्षरातलं पत्र
ज्या ह्या पत्रामुळे तिचा डाव उघड झाला
ते पत्र उद्देशून आहे ओरॉन्तला
मला वाटायचं की सेलिमेन, त्याच्याकडे बघतही नाही कधी
मी समजून चाललो होतो, त्याला फुसका प्रतिस्पर्धी

फिलिन्त:

पण पत्रावरून संशय घेणं अनेक वेळा ठरतं व्यर्थ
जसा आधी वाटतो तसा, नसू शकतो त्याचा अर्थ

अल्सेस्त:

तीच गोष्ट आता मी, पुन्हा एकदा सांगू का?
माझ्या व्यवहारात आपण तोंड घालू नका

एलिआन्त:

तुला आवरायला हवी ही रागाची तिरीमिरी

अल्सेस्त:

तुझ्यावरच मी सोपवतो आता ही जबाबदारी
माझ्या पोळलेल्या हृदयाची जखम भरून यावी लवकर
याकरता आज घालावीस तूच हळुवार फुंकर
माझ्या अचल प्रेमाचा जिनं अव्हेर केला
त्या कृतक् प्रेमिकेवर मला घेऊ दे बदला
हा बदला घेण्याच्या कामी, होशील का माझी साथीदार?

एलिआन्त:

म्हणजे मी काय करू?!

अल्सेस्त:

– माझ्या प्रेमाचा स्वीकार!

माझ्या हृदयातली तिची जागा, करतो मी मोकळी
तू भरून काढू शकतेस तिथे झालेली पोकळी
मी अर्पण करीन तुला माझी अथांग प्रीती
अनन्वित स्नेह, आणि अपार भक्ती
राहीन मी सदोदित, तुझ्या दिमतीला
आणि अशा प्रकारे तिचा घेईन मी बदला

एलिआन्त:
हे बघ, मी समजू शकते तुझ्या मनाचं दुखणं
आणि नाही झिडकारू पाहात तुझ्या हृदयाचं देणं

पण कदाचित असू शकेल हे अरिष्ट, तुझ्या कल्पनेपेक्षा लहान
आणि अवाजवी ठरू शकेल, बदला घेण्याची ही तहान
प्रेमिकेकडून होते जखम, तेव्हा सूडाची येते खुमखुमी
पण प्रत्यक्षात असल्या बेतांची, अंमलबजावणी होतेच कमी
धागे पुरते तोडण्यासाठी, कारणं भले असोत हजार
तिने केलेले सारे गुन्हे, पुन्हा विसरले जातात पार
वाईट चिंतलं होतं तिचं, याची होते पुरी विस्मृती
प्रेमातलं भांडण कितपत टिकतं, याची येते पुन्हा प्रचीती

अल्सेस्त:
नाही. विस्मृती होण्यासारखा, हा गुन्हा नव्हे मामुली
आता मी तिला मेलो, आणि ती मला मेली
माझ्या तिच्या नात्याचा, शेवटचा हा दिवस आज
मी तिच्यावर प्रेम केलं, याची मला वाटते लाज

ती इकडेच येते आहे –
तिला पाहून पुन्हा एकदा, उसळून उठतंय माझं मन
तिच्या अधम कृत्यांबद्दल करेन तिचं वाक्ताडन
कापून टाकीन तिच्या मायावी आकर्षणांचं केंजळ
आणि घेऊन येईन तुझ्यापाशी, माझं हृदय शुद्धनिर्मळ

(एलिआन्त आणि फिलिन्त निघून जातात.)

---

**प्रवेश तिसरा**

अल्सेस्त:
देवा रे! घालू शकेन का मी माझ्या मनावर लगाम?!

(सेलिमेन प्रवेश करते.)

सेलिमेन:
काय झालं?! का बरं आलाय तुला इतका घाम?
का सोडतोयस असे लांबलचक सुस्कारे?
आणि का रोखतोयस माझ्यावर तांबारलेले डोळे, जणू असावेत फुललेले निखारे?

अल्सेस्त:
मनुष्यप्राण्याकडून घडू शकते जितकी फंदफितुरी
त्याच्या रसातळाचीही होणार नाही, तुझ्याशी बरोबरी
जरी अहर्निश धुंडाळली नरकातली एककेंद्री वर्तुळं
तरीही गवसणार नाही तुझ्यासारखं पिशाच्च, बीभत्स आणि काळं

सेलिमेन:
अहाहा! काय हे मृदु शब्दांचे हलकेसे तरंग

अल्सेस्त:
विनोद करून मारून नेण्याचा हा नव्हे प्रसंग
जास्त शोभून दिसेल तुला, जर झालीस शरमेनं चूर
कारण तुझ्या बदफैलीचा पुरावा आहे पुरेपूर
हेच वर्तवीत होती, माझ्या हृदयाची अस्वस्थ स्पंदनं
बजावीत होती मला, की नको खरी मानूस हिची आश्वासनं!
भले तुला आवडत नसेल माझी सततची संशयखोरी
पण त्यामुळेच उघडकीस आली तुझी ही फंदफितुरी
तुझा सारा धूर्तपणा, आणि बनवाबनवीची हातोटी
जे लपवू पाहात होती, ते कळलंच मला शेवटी

पण सूड न घेता, मी सोसेन हा अवमानाचा चटका
असं मात्र तू, समजू नकोस बरं का!

हे मी समजतो, की प्रेमात करता येत नसते सक्ती
आणि स्वत:च्याही नकळत प्रेमात पडते व्यक्ती
कुणाच्याही हृदयावर नाही गाजवता येत सरंजामी
तेच ठरवतं आपल्या आपण, कोण होईल त्याचा स्वामी
जर आधीच म्हणाली असतीस तू, की नाही वाटत प्रेमभाव
तुला माझ्याबद्दल, तर तक्रारीसाठी मला उरला नसता वाव
जर पहिल्यापासूनच झिडकारलं असतंस, माझ्या प्रेमाचं गाऱ्हाणं
तर दिली नसती मी, नशिबाव्यतिरिक्त कुणालाही दूषणं

पण नंतर मला फसवणं, आधी चेतवून प्रेमाच्या ज्वाला
निव्वळ विश्वासघातच म्हणावं लागेल ह्या अशा कृत्याला
जिला साजेशी शिक्षा नाही, अशी ही आहे भयंकर आगळीक
तिच्याविरुद्ध वाट्टेल ते करण्याची, दिलीय मी स्वत:ला मोकळीक

होय शिंदळे! होऊ दे तुझा थरकाप
कारण मी माझा राहिलो नाही, बनलोय एक जिवंत शाप
इतका जबरदस्त आहे, माझ्या प्राणावरचा हा घाला
की माझ्या संज्ञा आता, जुमानत नाहीत बुद्धीला
माझा संताप गाजवू पाहतोय, माझ्या देहावर अधिकार
माझ्या हातून जे घडेल, त्याला मी नसेन जबाबदार

सेलिमेन:
अरे, का असे करतोयस वेड्यासारखे हावभाव?
उरल्यासुरल्या शहाणपणाचा केलास की काय लिलाव?

अल्सेस्त:
होय होय, शहाणपणा गमावला मी, जेव्हा टाकली तुझ्यावर नजर
आणि प्यायलो घटाघट, तुझ्या आकर्षणाचं जहर
आपखुषीने मी बनलो, फसव्या विभ्रमांचं सावज
कारण त्यांच्या हेतूबद्दल, होते माझे गैरसमज

सेलिमेन:
नक्की कुठल्या फसवणुकीबद्दल आहे तुझं गाऱ्हाणं?

अल्सेस्त (खिशातून एक कागद बाहेर काढतो):
वाहवा! बेमालूम जमतं हिला, असलं वेड पांघरणं
पण आता या पांघरुणाला लावतोच मी कातर
इथे डोळे फिरव, आणि ओळख बघू कुणाचं अक्षर
हा पुरावा नुसता बघताच, बंद होईल तुझी बोलती
उघडा पडेल सारा डाव, अन् फें फें उडेल पुरती

सेलिमेन:
तू इतका अस्वस्थ झालास ते याच्यामुळे?

अल्सेस्त:
शरमेने कसे पडले नाहीत तुझे गाल काळे?

सेलिमेन:
यात शरम वाटण्यासारखं काय आहे बाई?

अल्सेस्त:
काय?! फसवेगिरीच्या जोडीला तू उभी करतेस बेपर्वाई?
तू नाकारतेस हे पत्र, कारण त्याच्याखाली नाही सही –

सेलिमेन:
पण माझंच अक्षर मी नाकारण्याचं कारण नाही

अल्सेस्त:
सरळसरळ दोषारोप करते आहे तुझ्यावर, ह्या पत्राची शैली
आणि तरीही ते बघून, तुला लाज नाही वाटली?!

सेलिमेन:
तुझ्या विक्षिप्तपणाला खरोखर नाही पारावार

अल्सेस्त:
छे! छे! छे! छे! अजूनदेखील तू मानत नाहीस हार?
ज्या पत्राचा विषय आहे ओरॉन्त
ते वाचून मी कसा राहू शांत?!

सेलिमेन:
ओरॉन्त?! पण तुला कोण म्हणालं, की त्याला उद्देशून आहे हे चिठोरं?

अल्सेस्त:
ज्या व्यक्तीनं ते मला दिलं, ती तसं म्हणाली खरं
पण हे दुसऱ्या कुणासाठी आहे असं आपण समजू
तरीदेखील त्यामुळे कशी सावरेल तुझी बाजू?
आणि कशी कमी होईल, तुझ्या अपराधाची तीव्रता?

सेलिमेन:
पण जर ते पत्र असेल एका मैत्रिणीकरता
तर मग तुला तक्रारीचं काय कारण?

अल्सेस्त (स्वगत):
वाहवा! भलतंच हुशारीचं आहे हे नागमोडी वळण
हा नवीन बचाव मला होता थोडा अनपेक्षित
पण मला वाटतं त्यामुळेच, तिचा गुन्हा होतो शाबीत

(सेलिमेनला)
कसली लंगडी सबब तू खपवू पाहतेस मला!
अजून रिकामा नाही झाला, माझा वरचा मजला
मला कळत नाही: तुझ्या ढोंगाचं हसू यावं की संताप
पचवून दाखव बघू, असली लोणकढी थाप!
ज्या पत्राच्या वाक्यावाक्यातून, ऐकू येतो प्रेमाचा अंतर्नाद
ते स्त्रीला उद्देशून आहे, हा कुणाला पटेल युक्तिवाद?
समजावून सांग मला प्रत्येक वाक्य, थांब मी घेऊन येतो वही,
टिपणं करायला आणि वाचतो हे पत्र तुझ्यासमोर –

सेलिमेन:
मला असलं काहीही करायचं नाही
तू आता थांबवावास हा हास्यास्पद प्रकार
तुला कुणी दिला, माझ्याशी असं बोलायचा अधिकार?

अल्सेस्त:
हे बघ, शांत हो, नको करूस उगीच कांगावा
हे पत्र बघून मला सांग: असल्या शब्दप्रयोगांचा कुणी काय अर्थ घ्यावा?

सेलिमेन:
मी काही सांगणार नाही; ज्याला जो वाटेल, तो अर्थ त्यानं घ्यावा
कुणाचं काय मत होतं याची मला नाही पर्वा

अल्सेस्त:
पण कसं असू शकेल हे पत्र एका स्त्रीकरता
एवढं जरी सांगितलंस तरी सुटेल सारा गुंता

सेलिमेन:
नाही, ते पत्र आहे ओरॉन्तसाठीच, तेव्हा निष्फळ आहे यावर वाद
तो माझ्यावर प्रेम करतो, आणि मीही त्याला देते प्रतिसाद
मला तो आवडतो, त्याच्या सहवासात मला वाटते गंमत
तू जे म्हणशील ते, मी कबूल करीन बिनदिक्कत
तुला वाटेल ते कर, नको थांबूस कशामुळे
आणि आता माझ्यासमोरून, हालव तुझे चंबूगबाळे

अल्सेस्त:
हे देवा! असं क्रौर्य जन्माला आलं होतं का पूर्वी कधीकाळी?
तुडवलं गेलं होतं का कुणाचं प्रेम असं पायदळी?
खरं तर माझ्यावर झालाय धडधडीत अन्याय
पण हिला जाब विचारताच, ही माझ्यावरच घसरते काय?!
माझ्या वेदनेला आणि संशयाला, डिवचते ही महामाया
मला वाटेल ते पढवते, आणि मारते सगळ्याच्या बढाया

पण तरीही माझं हृदय, आहे असं बदमाश
की नाही मला तोडू देत, तिने टाकलेले पाश
ज्या बदफैली प्रेमवस्तूत गुंतले आहेत माझे प्राण
तिचा धि:कार करण्याचे माझ्या अंगी नाहीत त्राण

हे निर्दयिनी! माझ्या हृदयाला, माझ्यापेक्षा तूच ओळखतेस खरी
स्वत:च्या गैरफायद्यासाठी, राबवतेस माझी कमजोरी
तुझ्या विखारी डोळ्यांनी वेडावलेली, माझ्या हृदयाची महानगरी
ही तू समजतेस तुझीच खाजगी मक्तेदारी

माझ्या ह्या आरोपांपासून कर निदान स्वत:चा बचाव
आणि सोडून दे, आपण दोषी असल्याचा हा बनाव
ह्या पत्रासंबंधी तू निर्दोष आहेस, असं मला पटवून दे
मग माझं प्रेम उतावीळ होईल, तुला देण्यासाठी, संशयाचे हजार फायदे
आपण विश्वासू आहोत हे मला पटवण्याचा जर केलास प्रयत्न, तर मी
तुझ्यावर विश्वास ठेवण्याचा प्रयत्न करीन, याची देतो हमी

सेलिमेन:
तू मूर्ख आहेस, आणि संशयी आहेस भयानक
मी तुझ्यावर प्रेम करते, पण त्याला तू नाहीस लायक
तुझ्या मते खरी गोष्ट आहे मी लपवलेली
पण तुला असं वाटलंच कसं, की मी घसरेन इतकी खाली?
जर माझी खरोखरीच दुसऱ्यावर असती प्रीती
तर तसं सांगायला मला कुणाची बंदी होती?
तुझ्यावर माझं प्रेम आहे, याची मी दिलीय हमी
मग तुझा संशय फेडायला, ती का पडते कमी?
अशी हमी दिल्यानंतर, शंका उराव्यातच का?
आणि त्या मला तू ऐकवणं, हा अपमान नव्हे का?

आपल्या मनातलं करणं उघड
स्त्रीला नेहमीच जातं जड
आमच्या उत्कटतेचा विरोध करते आमची शालीनता
आणि थोपवून धरते तिची उघड वाच्यता

आणि म्हणूनच –
जो प्रेमिक आम्हाला ओलांडताना पाहतो हा अडथळा
त्यानं निमूटपणे स्वीकारायला हवा, आमचा निर्वाळा
जे उच्चारण्यासाठी करावं लागतं, स्वत:शीच तुंबळ युद्ध
त्यावर तू अविश्वास दाखवलास, तर का होऊ नये मी कृद्ध?

माझ्यावर शंका घेण्याची केलीयस तू शहामत
तेव्हा आता मला, उरली नाही तुझी किंमत
आणि तरीही मला वाटावा, तुझ्याबद्दल प्रेमाचा अंश
ह्या खुळेपणाबद्दल, माझी बुद्धी करतेय मला दंश
मला वाटतं दुसऱ्या कुणाला, मी देऊन टाकावं माझं मन
जेणेकरून व्हावं तुझ्या, संशयाचं पश्चात् समर्थन

अल्सेस्त:
माझ्या मानगुटीवर बसलेलं हे प्रेम, पाहील माझा अंतकाळ
कैदाशिणी, फक्त मला भुलवण्यासाठी, आहेत तुझे हे शब्द मधाळ
पण या साऱ्याला महत्त्व नाही, कारण मला खुणावतेय माझी नियती
तुझ्याभोवताली कायमची गुरफटलीय, माझी लाचार भ्रष्टमती
मला चोखाळली पाहिजे, तुझ्याच दगाबाज हृदयाची वाट
की ज्याचा काळेकुट्टपणा, उत्तरोत्तर होईल दाट

सेलिमेन:
छे! हेही माहीत नाही तुला की प्रेम कशाशी खातात

अल्सेस्त:
नाही! उलट प्रेमानंच शरीर खाल्ल्यामुळे, उरलीय फक्त माझी कात
माझं प्रेम आता उधळलं आहे असं बेसुमार
की सुचू लागले आहेत त्याला, तुझ्या अहिताचे विचार
त्याला वाटतं की तुला, कुणी म्हणू नये देखणी
आणि नशिबी यावी तुझ्या, निष्कांचन राहणी
जन्म झाला तेव्हा तुला, नसायला हवं होतं विधात्याचं देणं
नसायला हवा होता पैसा, प्रतिष्ठा वा घराणं

मग मी केला असता, त्याग तुझ्याकरता
आणि ह्या दैवी अन्यायाची, शमवली असती तीव्रता
आणि मग प्रतिदिनी मला झाला असता हर्ष
की फक्त माझ्या प्रेमामुळे तुझा झाला आहे उत्कर्ष

सेलिमेन:
मला शुभेच्छा देण्याची, ही रीत आहे थोडी आगळी
देव करो, आणि तसं न होवो कधीकाळी
(चाहूल घेत)
अरे हा तर दुब्वा –
आणि अंगावर पांघरलेला त्याचा चमत्कारिक अल्पाका

---

**प्रवेश चौथा**

(अल्सेस्तचा नोकर दुब्वा येतो.)

अल्सेस्त:
हा असला कसला कोट घातलायस? आणि इतका घाबरलायस का?
झालं तरी काय?

दुब्वा:
साहेब –

अल्सेस्त:
हं बोल पुढे –

दुब्वा:
काही रहस्यांचा झाला पाहिजे उलगडा

अल्सेस्त:
कोणत्या?

दुब्वा:
आपल्या आयुष्याचा झाला आहे चुथडा

अल्सेस्त:
काय?!

दुब्वा:
मी बोलू?

अल्सेस्त:
ताबडतोब बोल! राहू नकोस नुसता उभा

दुब्वा:
हा जो कोणी आहे –

अल्सेस्त:
हट! अरे नतद्रष्ट शुंभा –
नीट बोलशील की नाही?

दुब्वा:
साहेब, आपण मागे घेतला पाहिजे पाय

अल्सेस्त:
म्हणजे?

दुब्वा:
आवाज होता कामा नाय

अल्सेस्त:
आणि ते का?

दुब्वा:
आपण केला पाहिजे सूंबाल्या

अल्सेस्त:
कारण?

दुब्बा:
नाहीतर गोवऱ्या मसणात गेल्या

अल्सेस्त:
पण झालं तरी काय? हा कसला वेडाचार?

दुब्बा:
हलवा आता इथून बिढार

अल्सेस्त:
नक्की काय चाललंय ते आधी नीट सांग
नाहीतरी हरामखोरा, मोडीन तुझी टांग

दुब्बा:
काळ्या डगल्यातला एक माणूस, ज्यानं घातला होता टोप
स्वयंपाकघरात असा घुसला, उडवून माझी झोप
चिठ्ठी जी देऊन गेला, ती आहे इतकी किचकट
तिचा अर्थ लावणं, म्हणजे महाकर्मसंकट
तुमच्या खटल्याशी आहे, नक्कीच काही संबंध
पण त्यातलं अक्षर वाचायला, आणला पाहिजे ब्रम्हसमंध

अल्सेस्त:
पण मी आता काय करू ऐकून हे दळण?
शहर सोडून जायचं नक्की काय कारण?

दुब्बा:
हे सगळं झाल्यानंतर गेला एक तास
एक माणूस आला होता, तुमचा मित्र आहे खास
तुमचा शोध घेण्यासाठी, केले त्याने बरेच कष्ट

आणि तुम्ही नाही हे बघून, दिली मला कानगोष्ट
तुमच्याबद्दल माझ्या मनी आहे पूज्यभाव
हे बघून – थूत च्यायला, काय बरं त्याचं नाव?

अल्सेस्त:
नाव जाऊ दे त्याचं, त्यानं निरोप काय दिला?

दुब्वा:
आता तुमचा मित्र म्हटल्यावर, मी जास्त विचारू कशाला?
त्याचं म्हणणं असं पडलं, की तुम्ही पळून जावं तडक
जर मागे राहिलात, तर होऊ शकते अटक

अल्सेस्त:
पण का? आणि त्याला शोधत आता मी कुठे फिरू?

दुब्वा:
त्यानं मागून घेतला कागद आणि बोरू
मला वाटतं सगळं त्यानं, लिहिलं आहे तपशीलवार
ते जर एकदा वाचलंत, तर काही रहस्य नाही उरणार

अल्सेस्त:
मग दे, काय लिहिलंय ते –

सेलिमेन:
काय चाललाय हा प्रकार?

अल्सेस्त:
माहीत नाही –
पण समजून घेण्याचा, माझा अजूनदेखील आहे विचार

(दुब्वा दोन्ही खिसे चाचपडतो आहे; त्याच्याकडे बघून)
मूर्ख आहेस! हाकलून दिला पाहिजे तुला, ढुंगणात मारून काठी

दुब्वा:
चूकच झाली माझी. तुमच्या टेबलावरच राहिली, बहुतेक ती चिठ्ठी

अल्सेस्त:
ह्या नालायकाला मी –

सेलिमेन:
डोक्यात राख घालायला, नंतर मिळेल पुष्कळ अवधी
ही भानगड काय आहे, ते जाऊन पाहा आधी

अल्सेस्त (जाताजाता):
मला वाटतं नियतीचा असा आहे डाव
की तुझ्याशी बोलायला, मला सापडू नये वाव
पण ह्या नियतीवर मला आता मात करायला हवी
पुन्हा तुला मी भेटेन आज, सूर्यास्त होण्यापूर्वी

❈

## ❖ अंक पाचवा ❖

**प्रवेश पहिला**

(रंगमंचावर अल्सेस्त आणि फिलिन्त.)

अल्सेस्त:

मी तुला सांगतो, माझा निश्चय आहे पक्का

फिलिन्त:

अरे, बातमी वाईट असली, तरी त्याचा अर्थ असा का –

अल्सेस्त:

नाही! तू कितीही जरी पिंजारलेस, कुतर्काचे धागे
तरी माझा निर्णय, मी घेणार नाही मागे
चोहोंकडे पसरलीय अनाचाराची साथ
तेव्हा माणसांच्या जगाला, मी मारणार आहे लाथ

प्रतिष्ठा, सन्मान, सत्य आणि कायदा
या साऱ्या बाबींचा मी गृहीत धरला फायदा
'तुम्हीच जिंकणार बघा,' असा प्रत्येकाचा दिलासा
ऐकून माझ्या हक्कावरती ठेवला मी भरवसा
आणि एवढं सगळं असूनदेखील शेवटी घात झाला
न्याय होता माझ्यामागे, पण तरी हरलो खटला
ज्यावर बट्टा बदनामीचा, असला एक इसम पाजी
सरळसरळ खोटं बोलला, अन् मारून गेला बाजी
उभा राहिला कठड्यात, आणि रचली एक कथा बेगडी
पण तीच खरी ठरली शेवटी, आणि कापली गेली माझी मुंडी
त्याच्या ढोंगाच्या भारानं, सटकला तराजूचा काटा
होत्याचं झालं नव्हतं, आणि न्याय झाला उलटापालटा

नोंदीत त्यानं हवा तसा, करून घेतला बदल
पण त्याच्या मते मला अजून, घडली नाहीय अद्दल

कुणीतरी छापून काढलंय एक भिकार चोपडं
हातातदेखील धरवत नाही असलं पुस्तक घाणेरडं
मी तर म्हणेन त्याच्यावर, घाला बंदी बेलाशक
आणि हा चोर म्हणतो, की मी आहे त्याचा लेखक!
हे ऐकून, पुटपुटला ओरॉन्त, दातांना जीभ लावीत
की माझ्या घरी पाहिलंय त्यानं, त्याचंच नेमकं हस्तलिखित!
माझं वाटोळं करणं, हेच ठरवलंय त्यानं उद्दिष्ट
आणि माझा गुन्हा तो काय, तर मी त्याच्याशी बोललो स्पष्ट

हाच माझ्याकडे आला, मी नको म्हणत असता
आणि म्हणाला सांगा, कशी आहे माझी कविता
आणि मी कसलीसुद्धा, लपवाछपवी केली नाही
केला नाही अपलाप, सत्याचा आणि त्याचाही
म्हणून हा बनतो माझा सर्वात मोठा वैरी
खोटा आळ घेण्यापर्यंत गाठली ह्यानं पायरी
माझ्यावरती आता हा, डूख धरणार आमरण
त्याचं सुनीत वाईट म्हटलं, एवढंच एक त्याला कारण
झाली आहे जगात, असल्या नालायकांचीच भरती
येनकेनप्रकारेण, ज्यांना हवी फक्त कीर्ती

सच्चाई, सचोटी, सन्मान आणि न्यायप्रियता
ह्या सगळ्या शब्दांचा, उलटा अर्थ घ्यायचा आता
हे जग जग नव्हे तर दरोडेखोरांची गुहा
म्हणूनच मी आता, इथून चाललो पहा
माणूसच माणसासाठी बनला आहे लांडगा
दगलखोरांनो! मी इथून जातो असं सगळ्यांना सांगा!

फिलिन्त:
असला निर्णय घेण्याआधी तू शांत ठेवावंस डोकं
नुकसान एवढं नसेलही, तुला आधी वाटलं तितकं

तुझा शत्रू तुझ्याविरुद्ध पिकवत असेल कंड्या
पण अजून तरी तुला नाहीत पडलेल्या बेड्या
याचा अर्थ त्याच्यावरच, उलटून पडलाय त्याचा डाव
हा प्रचार खोटा आहे, हे कळून चुकलाय सारा गाव

अल्सेस्त:
जरी झाली बदनामी, तरी त्याला त्याची नसते तमा
हरामखोरी करण्याबद्दल त्यानं स्वत:ला केलीय क्षमा
ह्या साऱ्या मामल्यात त्याचा, होणार नाही केसही वाकडा
नवीन प्रकरण करण्यासाठी, उभा राहील पुन्हा खडा

फिलिन्त:
हे बघ, त्यानं तुझ्याविरुद्ध केला असेल आरडाओरडा
पण त्याचा दुष्परिणाम झालाय तसा फार थोडा
तेव्हा काळजीचं कारण दिसत नाही मला
आता राहता राहिला, तुझा हा खटला
त्यासंबंधी तू, करू शकतोस अपील
आणि ह्या निकालाबद्दल –

अल्सेस्त:
त्यात मला आता नाही वाटत हशील
हा निकाल म्हणजे अन्यायाची हद्द
पण मी एवढं बघेन, की तो होणार नाही रद्द
चांगला अन्याय कसा करावा, अशा उदाहरणार्थ
फार जपून ठेवला पाहिजे, आपण हा पदार्थ
न्याय आणि सचोटीची, होऊ लागली जशी परवड
त्या मार्गावरचा आहे, तो एक मैलाचा दगड

मी मोजलीय या दगडाची किंमत, वीस हजार लीव्र तूर्वा
आणि हा खर्च पुरता वसूल व्हावा
म्हणून करीत राहणार आहे मी, मानवजातीविरुद्ध बोंबाबोंब
आणि जतन करणार आहे हृदयात, तिच्याविषयी घृणेचे कोंब

फिलिन्त:
तरी पण –

अल्सेस्त:
तरी पण, मी म्हणतो तू एकूण सोड माझी चिंता
ह्या साऱ्यावर तू तरी काय बोलशील आता?
जे काही घडलं त्याचं करणार नाहीस समर्थन
एवढंच फक्त तू आता दे मला वचन

फिलिन्त:
तू म्हणतोस त्यातलं मला काहीच अमान्य नाही
सगळीकडे बोकाळलीय, लुचपत आणि कंपूशाही
आज फक्त कामी येते दुसऱ्यांची ठकवाठकवी
मला हे कबूल आहे, की ही स्थिती बदलायला हवी
पण असतील भले सारे अनाचारात दंग
म्हणून काय समाजातून काढून घ्यायचं अंग?

सार्वजनिक नीतीला लागते जेव्हा ओहोटी
तेव्हाच आपल्या स्वभावाची लागते खरी कसोटी
आपल्यातल्या गुणांना तेव्हाच काही होतात कष्ट
कारण भोवतालचे सर्वचजण, जर असतील सुष्ट,
निष्कपट, न्यायप्रिय आणि स्पष्टवक्ते
तर सद्गुणांची मग गरजच काय उरते?

अन्याय जरी झाला, तरी मनाचं राखून संतुलन
जाता यावं पुढे, याचसाठी करावं गुणांचं संगोपन
आणि असेल जर आपल्या मनावर ताबा –

अल्सेस्त:
जरा थांबवशील का, हा अमोघ वाणीचा धबधबा?
मी सपशेल मान्य करतो, तुझ्या भाषेची अवीट गोडी
पण वेळाची आणि शब्दांची करू नकोस तू नासाडी

मला लाभलेली नाही तुझ्याइतकी वाग्सिद्धी
पण मी निघून जावं असं मला सांगतेय माझी बुद्धी
कुठे मी काय बोलेन, हे माझं मलाच नाही माहीत
पुढे शंभर ठिकाणी मी येणार आहे अडचणीत

सेलिमेनला भेटलं पाहिजे मला, कोणी करू नका अटकाव
तिला सांगितला पाहिजे, हा माझा प्रस्ताव
मी तिला विचारीन, होशील का माझी सांगाती
मला जोखली पाहिजे, तिची माझ्यावरची प्रीती

फिलिन्त:
येतोस वर माझ्याबरोबर? आपण एलिआन्तची वाट बघूया

अल्सेस्त:
नको. माझ्या मनावर पसरलीय खिन्नतेची छाया
तू आपला एकटाच जा वर
आणि राहू दे मला, ह्या अंधाऱ्या कोपऱ्यात, माझ्या निराशेबरोबर

फिलिन्त:
वाट पाहण्यासाठी ही सोबत नव्हे चांगली
मी म्हणतो एलिआन्तला, की तूच ये खाली

(फिलिन्त वर जातो, आणि अल्सेस्त एका अंधाऱ्या कोपऱ्यात बसून राहतो.)

---

**प्रवेश दुसरा**
(रंगमंचावर ओरॉन्त आणि सेलिमेन.)

ओरॉन्त:
आपल्या माझ्या नात्याची काय होणार गती
याचा निर्णय आता आहे, केवळ आपल्या हाती
आपण फक्त माझ्या आहात, अशी हवी मला खात्री

नाही रुचत प्रेमिकांना, अशी स्थिती अधांतरी
जर माझ्या भावनेने फोडला असेल, आपल्या हृदयाचा तट
तर त्या घटनेचा, दाखवा पुरावा झटपट
आणि मी विचारात घेईन फक्त एकच पुरावा
अल्सेस्तचा आपण, पुरता अव्हेर करावा
माझ्यावरच्या प्रेमाखातर, त्याला द्यावी सोडचिठ्ठी
आपल्या घराचे दरवाजे बंद व्हावेत त्याच्यासाठी

सेलिमेन:
पण तुझ्याच तोंडून ऐकली आहे, मी त्याची प्रशंसा
आणि आत्ताच तुला त्याचा, त्रास होऊ लागला कसा?

ओरॉन्त:
बाकी सगळी स्पष्टीकरणं, आहेत सध्या अलाहिदा
तुमचा कल कोणाकडे, हाच आहे मुख्य मुद्दा
तुम्ही आत्ताच निवड करा, एकतर मी नाहीतर तो
मी आपला इथे वाट बघत बसतो

(अल्सेस्त कोपऱ्यातून बाहेर येतो.)

अल्सेस्त:
या माणसाच्या बोलण्याला आहे माझा दुजोरा
हा निर्णय लांबणीवर न टाकलेलाच बरा
त्याच्या मनात आहे जी खळबळ, तीच आहे माझ्यातही
निश्चिंती झाल्याखेरीज मी राहू शकणार नाही
प्रवासात जेव्हा फुटतात, दोन वेगळे रस्ते
तेव्हा दोन्हींवरून जाता येईल अशी सोय नसते

ओरॉन्त (अल्सेस्तला):
श्रीमन्, या प्रकरणी जर आपलं, भाग्य ठरलं अधिक सरस
तर आपल्या सुखाचा विचका करण्यात, मला नसेल काही रस

अल्सेस्त:
तुमचा रस कशात आहे, याची तुम्हीच करा उस्तवारी
मला नको तुमच्याबरोबर, हिच्या हृदयाची भागीदारी

ओरॉन्त:
माझ्यापेक्षा तुमचं प्रेम तिला वाटत असेल अव्वल –

अल्सेस्त:
किंचित देखील तुमच्याकडे असेल तिचा कल –

ओरॉन्त:
तर पुन्हा तिच्या चेहऱ्याचं नको मला दर्शन

अल्सेस्त:
तिच्या मधुर सहवासाचं करीन मी लंघन

ओरॉन्त:
मदाम, याचा निकाल लावून टाका, आत्ताच्या आत्ता

अल्सेस्त:
आणा मनातलं जिभेवर, अगदी बिलकुल न कचरता

ओरॉन्त:
तुमची निवड कोण आहे, हे तुम्ही सांगा फक्त

अल्सेस्त:
तुमच्या मनातला विचार, होऊन जाऊ दे व्यक्त

ओरॉन्त:
का हो? निवड करताना अडचण भासते की काय थोडी?

अल्सेस्त:
समतोल आहेत की काय तराजूची दोन्ही पारडी?

सेलिमेन:
अगं आई गं! तुमचा हा हट्टाग्रह, आहे अगदी अस्थानी
शिष्टाचाराच्या बाबतीत, आहात तुम्ही अज्ञानी
नाही आहे माझं मन, थोडं देखील चंचल
मला पक्का ठाऊक आहे, माझा स्वत:चा कल
हे एक तुम्ही दोघांनी नेहमी समजून असावं
की तुम्हा दोघांत करता येईल, मला सहज उजवं डावं

पण खरी गोष्ट अशी, की लाज वाटते माझीच मला
असा निकाल सरळसरळ, तोंडासमोर सांगायला
असे असतात काही शब्द, की ज्यांनी माणूस होतं नाराज
ते बोलणं सगळ्यांसमोर, हा माझा तरी नाही रिवाज

जर एखाद्याने सर केला असेल, तुमच्या हृदयाचा किल्ला
तर ते सूचित करण्यासाठी इतका देखावा तो कशाला?
आणि याउलट, असफल प्रेमिकाला, न होऊ देता संतप्त
तीच बातमी कळवण्याचे, मार्ग आहेत अनेक सुप्त

ओरॉन्त:
नाही, तसं नाही –
तुम्ही अगदी स्पष्ट बोला, मला नाही त्याचा डर
माझी संमती आहे –

अल्सेस्त:
आणि पहिल्यापासून माझाही याच्यावरच आहे भर
की मला काय वाटेल, इकडे नको देऊ लक्ष
तुला जे म्हणायचं ते म्हण सर्वांसमक्ष
जगाची मर्जी सांभाळण्यात, खर्च होते तुझी शक्ती
पण नको आता दिरंगाई, आणि नको आता अनिश्चिती

ताबडतोब स्पष्ट कर, हा सारा प्रकार
नाहीतर तसं न करणं, हाच समजेन मी नकार

ह्या तुझ्या मौनाचा मला आला आहे वीट
मी त्याचा अर्थ घेईन, वाईटातला वाईट

ओरॉन्त:
श्रीमन्, आपण जे बोललात त्याला, मी खरोखर देतो दाद
माझेच विचार मांडल्याबद्दल, आपल्याला धन्यवाद

सेलिमेन:
कोण जाणे कुठून काढलंत तुम्ही दोघांनी हे खूळ
तुमच्या या कटकटीनं झालाय मला मस्तकशूळ
दया करा माझ्यावर, आता दोघे व्हा शांत
माझी सुटका करण्यासाठी येते आहे एलिआन्त

---

**प्रवेश तिसरा**
(एलिआन्त आणि फिलिन्त येतात.)

सेलिमेन (एलिआन्तला):
अगं बघ ना, या दोघांनी केलंय माझ्याविरुद्ध संगनमत
आणि त्रास देतायत मला, मघापासून सतत
इरेला पेटलेत दोघे, लावलाय एकच धोशा
की दोघांपैकी एकाची मी करून टाकावी निराशा!
त्यांच्यापैकी एका कुणाला मी सांगावं तोंडावर
की माझ्यासमोरून तू आता, तोंड बरीक काळं कर

तू कधी पाहिलायस का, असला अगोचर प्रकार?

एलिआन्त:
आता असल्या प्रश्नावर मी काय बोलणार?
कुणी मनातलं लपवू नये, हीच असते माझी इच्छा
तेव्हा चुकीच्या व्यक्तीकडे केलीयस तू ही पृच्छा

ओरॉन्त:
मदाम, आता काय म्हणायचं ते एकदाचं म्हणा

अल्सेस्त:
जरा मनावर घ्या बहिणीचा टोमणा

ओरॉन्त:
निर्णय जाहीर करण्याचा समय येऊन ठेपला

अल्सेस्त:
तू नाहीच बोललीस, तर बोलेल तुझा अबोला

ओरॉन्त:
फक्त 'मी अमुकला निवडते', इतकेच म्हणा शब्द तीन

अल्सेस्त:
आणि नाही काही म्हणालीस, तर मी काय ते समजून घेईन

---

**अंतिम प्रवेश**

(अकास्त, क्लितान्द्र आणि आर्सिनोए येतात.)

अकास्त (सेलिमेनला):
मदाम, आम्ही आपल्याला देऊ इच्छित नाही तसदी, तरी पण
आम्हाला वाटतं, की एका छोट्या गोष्टीचं, आपण करावं स्पष्टीकरण

क्लितान्द्र (ओरॉन्त आणि अल्सेस्त या दोघांना):
सज्जनहो, आपणही इथे आहात हे झालं फक्कड
कारण आपल्याशीही संबंधित आहे ही भानगड

आर्सिनोए (सेलिमेनला):
मदाम, मला इथे बघून आश्चर्य वाटेल तुम्हाला

पण ह्या दोघांमुळेच येण्याचा प्रसंग आला
आले दोघे माझ्याकडे, आणि मला सांगितली एक बातमी
की जिच्यावरती कधीही, विश्वास ठेवला नसता मी
मी म्हणतेय, की सेलिमेन मदाम आहेत तशा फार चांगल्या
त्यांच्याबद्दल अशा अफवा कशा काय पसरल्या?
मला वाटलं, की खोटं सुद्धा असू शकेल चक्षुर्वैसत्य
आणि स्मरून आपल्या दोघींची मैत्री नित्य
(बारीकसारीक कुरबुरी असतानाही), मी केलंय इथे आगमन
की जेणेकरून तुम्ही करावं, या अफवेचं खंडन

अकास्त:
मदाम, आम्ही आता बघूच, की चिडाचिडी न करता
कशी करून घेता आपण, या प्रसंगातून मुक्तता

(एक पत्र बाहेर काढतो.)
हे खरं का, की हे पत्र लिहिलंय आपण क्लितान्द्रसाठी?

क्लितान्द्र:
हे खरं का, की अकास्तला उद्देशून लिहिलीय, आपण ही नमुनेदार चिठ्ठी?

अकास्त:
लोकहो, हे अक्षर आपल्याला नक्कीच नाही अनोळखी
कारण याच्याचसारखी
अनेक पत्रं आपल्याला आली असणार पूर्वी
पण तरीही विशेष आहे, या पत्राची थोरवी
तेव्हा ऐका –

(वाचू लागतो.)

माझ्या खेळकरपणाबद्दल माझे कान उपटणं, आणि मी तुझ्याबरोबर नसते तेव्हाइतकी इतर कोणत्याच वेळेला मजेत नसते असा माझ्यावर आरोप करणं, हा तुझा फारच खोडसाळपणा झाला. हा माझ्यावर मोठा जुलूम आहे, आणि तू जर लवकर इथे येऊन त्याची भरपाई केली नाहीस, तर मी तुला जन्मभर माफ करणार नाही. ज्याच्याबद्दल तू कुरकूर करतोस, तो दांडगोबा व्हायकाऊंट –

तो इथे असायला हवा होता –

तो दांडगोबा व्हायकाऊंट मला कधीच आवडला नाही. आणि जेव्हापासून मी त्याला सतत दोन घटकाभर विहिरीत थुंकून पाण्यात भाकऱ्या काढत बसलेलं पाहिलं, तेव्हापासून माझं त्याच्याबद्दलचं मत पारच बिघडलं आहे. आणि त्या इटुकल्या मार्कीने

जनहो, मला सांगायला खेद होतो, की तो मीच –

आणि त्या इटुकल्या मार्कीने काल बराच वेळ माझा हात पकडून ठेवला. त्याच्याइतका क:पदार्थ इसम दुसरा कुणी माझ्या पाहण्यात नाही. त्याच्या घोळदार अंगरख्यानं आणि तलवारीनंच त्याच्या वजनातला बराचसा हिस्सा व्यापला आहे. आणि तो हिरव्या रिबनी लावणारा माणूस

(अल्सेस्तला) हा तुमचा उल्लेख आहे –

आणि तो हिरव्या रिबनी लावणारा माणूस त्याच्या तुसडेपणामुळे आणि हिरमुसलेपणामुळे काही वेळा माझी करमणूक करतो, पण गोळाबेरीज पाहिलं तर तो एक कमालीचा वैताग इसम आहे. तो सुनीतवाला माणूस

(ओरॉन्तला) हा माल तुमच्यासाठी आहे –

तो सुनीतवाला माणूस वाक्चातुर्याच्या मागे धावतो आहे, आणि सगळ्यांनी सांगून देखील त्याला लेखक व्हायची सुरसुरी आहे. तो काय म्हणतोय याकडे लक्ष द्यायचं माझ्यात बळ असत नाही, कारण त्याचं गद्य आणि पद्य ही दोन्ही सारखीच कंटाळवाणी आहेत. त्यामुळे हे तू नीट लक्षात घे, की तुला वाटते तितकी मी मजेत नसते, ज्या ज्या पार्ट्यांना मला नाईलाजानं जावं लागतं तिथे सगळीकडे मला तुझी फार आठवण येते, आणि मजा करताना आपल्या प्रेमाचं माणूस जवळ असलं तर आणखी मजा येते.

क्लितान्द्र:
आता माझी पाळी –
(वाचू लागतो.)

आणि ह्या गोडगोड बोलणाऱ्या क्लितान्द्रचा विषय तू काढलास म्हणून सांगते, की तो मला आवडण्याची काहीही शक्यता नाही. त्याच्यावर माझं प्रेम आहे असं समजणारा तो मूर्ख आहे, आणि तुझ्यावर माझं प्रेम नाही, असं समजणारा तू मूर्ख आहेस. शहाणपणा हाच होईल, की तुम्ही दोघांनी आपापल्या समजुतींची

अदलाबदल करावी. त्याचा मला जो ताप होतो तो कमी व्हावा, म्हणून तू मला वरचेवर भेटायला यायला हवंस.

(वाचणं थांबवतो.)

मदाम, आम्ही चकित झालोय, बघून आपलं रूप नवं
अशा व्यक्तीला काय म्हणतात, हे मी बोलायलाच हवं?
बास झालं. आपणच काढलेलं आपल्या स्वभावाचं रेखाचित्र
आम्ही दोघे आता मिरवू, सर्वांसमोर आणि सर्वत्र

अकास्त:
तोंड बंद ठेवण्यासाठी, मला होताहेत क्लेश
पण मदाम, आपली तशी लायकी नाही, की मी करावा आपला द्वेष
एक सांगून ठेवतो, की माझ्यासारख्या मार्कीचा झाला जर प्रेमभंग
तर माझी समजूत काढायला, माझ्या घरासमोर, लागेल तरुणींची रांग

(अकास्त आणि क्लितान्द्र निघून जातात.)

ओरॉन्त:
मदाम, तुम्ही म्हणालात की माझ्यावर तुमचं प्रेम आहे जिवापाड
आणि आता तुम्हीच माझी, करता अशी चिरफाड?
तुमच्या हृदयावर मारला आहे, चकचकीत पत्रा
त्यात चेहरा पाहणारे, तुमचे प्रेमिक आहेत सतरा

प्रेमात मी राहिलो बावळट, याची मला घडलीय अद्दल
मी तुमचे आभार मानतो, माझे डोळे उघडल्याबद्दल
माझं हृदय परत मिळालं, याचा आनंद आहे मला
यात तुमचा जो तोटा झाला, तोच समजतो, मी माझा बदला

(अल्सेस्तला उद्देशून)
श्रीमन्, तुमच्या प्रेमात आता नसेल माझा अडथळा
तुम्ही आणि मदाम, पुढे काय ते सांभाळा

(ओरॉन्त निघून जातो.)

आर्सिनोए (सेलिमेनला):
मदाम, मघापासून पाहतेय मी तुमच्या नीचपणाचा मासला
इतकं बघून गप्प राहणं, कसं जमेल कुणाला?
पाहिला होता का कुणी, असला घाणेरडा प्रकार?
आता इतरांच्या भानगडींत, मी लक्ष घालत नाही फार
पण, हे गृहस्थ (अल्सेस्तकडे बोट दाखवून), जे आहेत मोठे सद्गुणी
आणि करीत असतात तुमचाच विचार क्षणोक्षणी
तुमची पूजा करायला जे कमी –

अल्सेस्त (आर्सिनोएला उद्देशून):
मदाम, ते सगळं बघून घेईन माझं मी
मला समजतं माझं हित
आपण नका पडू त्या उस्तवारीत
आपण नका भांडू माझी भांडणं
कारण मला जमायचं नाही, आपली परतफेड करणं
मी दुसरीकडे जरी पाहिलं, काढण्याकरता वचपा
तरीदेखील आपल्यावर, व्हायची नाही माझी कृपा

आर्सिनोए:
श्रीमन्, तुम्हाला असं वाटतं, की मी टाकून बसलेय गळ?
सारखी आपली वाट बघतेय, की कधी तुम्ही येताय जवळ?
प्रेमाच्या बाजारात तुम्हाला नाहीय उठाव
मला वाटतं कमी करावा, तुम्हीहून स्वत:चा भाव
सेलिमेननं नाकारलेला हा असला सस्ता माल
मी खरेदी करावा, इतके नाहीयत माझे हाल
खडबडून जागे व्हा, आणि उंचावरून या खाली
माझ्या मनात तुमच्याकरता, जागा बिलकुल नाही खाली
तुम्ही आपले श्वास रोखून, पकडून ठेवा तिचा जोडा
बघू तरी केव्हा जमतो, हा इतका सुंदर जोडा

(आर्सिनोए निघून जाते.)

अल्सेस्त (सेलिमेनला):
अनेक गोष्टी पाहूनही, मी राहिलो स्तब्ध, फार प्रयत्नपूर्वक
आणि ऐकून घेतली प्रत्येकाची बडबड, एकसुरी लांबलचक
असं वाटतं का तुला, की मी गप्प राहिलोय पुरेसा वेळ?
आणि आता –

सेलिमेन:
हो, तू बोलण्याची आता आली आहे वेळ
मला तोडून बोलण्याचा मिळालाय तुला अधिकार
तू काहीही जरी बोललास, तरी मी काय करू तक्रार?
कबूल करते की मी चुकले, माझा उडालाय गोंधळ
लंगडी सबब शोधण्यासाठी, माझ्या अंगी नाहीय बळ

इतरांच्या रागाची मला पर्वा नाही फार
पण मला मान्य आहे, की मी आहे तुझी गुन्हेगार
समजू शकते मी तुझी सकारण नाराजी
माझी ही आगळीक तू विसरणार नाहीस सहजी
असह्य झालंय धारण करणं, माझं हे अप्रामाणिक हृदय
माझा तिरस्कार करण्यासाठी मी तुला कारण दिलंय
तेव्हा कर माझा तिरस्कार, मी अनुमती देते तुला –

अल्सेस्त:
पण मी करू शकेन का तसं, सटवे?!
तोडू शकेन का मी तुझ्या आकर्षणाचे दावे?
मी लाख करू पाहीन तुझा तिरस्कार महाभयंकर
पण माझ्या हृदयानं माझा आदेश धुडकावून लावला तर?

(एलिआन्त आणि फिलिन्त यांना उद्देशून)
करपून टाकतो आहे, माझ्या आत्म्याला, ह्या प्रेमाचा विखार
माझ्या अविचारी कामनेचे, तुम्ही दोघे, आहात साक्षीदार

पण इथे होत नाही माझ्या कहाणीचा अंत
ही शिळा ढकलत, नेणार मी शिखरापर्यंत

पुरुषाला लागू नाही ‘शहाणा’ हे विशेषण
कारण त्यात उरतोच शेवटी पुरुषपणाचा एक कण

(सेलिमेनला उद्देशून)
कुलटे, माझ्या हृदयाला माफ करावेसे वाटतात तुझे गुन्हे सरसकट
आणि तुझ्या प्रतारणेवर झाकावासा वाटतो विस्मृतीचा धूम्रपट
मी असं समजेन की नाहीस तू खरोखर दोषी
आणि तुझ्या अल्लड तारुण्याला जगरहाटीनं पाडलं फशी
पण त्यासाठी तू यायला हवंस माझ्या मागोमाग
आणि करायला हवास साऱ्या मनुष्यजातीचा त्याग
ज्या एकांतात मी होणार आहे कायमचा बेपत्ता
तिथे तू यायला हवंस, माझ्याबरोबर आत्ताच्या आत्ता

तुझ्या या पत्राकरवी केला आहेस जो अपाय
तो दुरुस्त करण्याचा हा एकमेव तरणोपाय
याच एका कृतीमुळे, धुऊन निघेल तुझा गुन्हा
आणि मी तुझ्यावरती, प्रेम करू शकेन पुन्हा

सेलिमेन:
काय? जग सोडून देऊ म्हातारी होण्याआधी?
आणि तुझ्याबरोबर वाळवंटात, घेऊ अकाली समाधी?

अल्सेस्त:
पण असेल जर तुझी, माझ्यावर प्रीती खरीखुरी
तर बाकी साऱ्या जगाची तुला काय मातब्बरी?
नाही पुरणार का तुला फक्त प्रेम माझं?

सेलिमेन:
कशी पेलू मी विसाव्या वर्षी, एकटेपणाचं ओझं?
ह्या क्षणी मी करावा इतका खडतर निर्धार
ह्या बाबीला माझं मन राजी नाही होणार

जर तू करू म्हणत असशील माझं पाणिग्रहण
तर तुला नकार देण्यासाठी माझ्याकडे नाही कारण
आणि लग्न –

अल्सेस्त:
नाही, सेलिमेन नाही, मला तुझ्यात आता वाटत नाही गोडी
हा तुझा नकार, म्हणजे उंटाच्या पाठीवरची शेवटची काडी
तुझ्यात मी पाहात होतो माझ्या जीवनातलं सर्व काही
पण तसं ते माझ्यात पाहायला तुझी तयारी नाही
मी झिडकारतोय तुझं प्रेम, जा, इथून चालती हो आता
साऱ्या नाजुक भावनांना लावला आहे मी पलिता

(सेलिमेन निघून जाते; अल्सेस्त एलिआन्तला उद्देशून बोलू लागतो.)

एलिआन्त, शतगुणांनी सजवलंय तुझं रूप
तुझा सरळ स्वभाव आवडतो मला खूप
माझ्या मनात नेहमीच जपलीय मी तुझी सुंदर प्रतिमा
ती जर मी तशीच ठेवली, तर तू करशील मला क्षमा?
अनंत दु:खांच्या बोजानं माझं हृदय झालंय हैराण
ते तुला देऊ करावं, इतके माझ्या अंगी नाहीत त्राण
मला जाणवू लागली आहे माझी निसर्गदत्त कमतरता
नाही विवाहाचं बंधन या जन्मी माझ्याकरता
सेलिमेननं अर्धवट खाल्लेला असा मी प्रेमिक उष्टा
तुझी अभिलाषा धरू लागलो, तर ती ठरेल तुझी कुचेष्टा
आणि म्हणूनच –

एलिआन्त:
अल्सेस्त, तू जपून चालायला हवंस तुझ्या पुढच्या प्रवासात
आज मला दिलासा हाच, की रिता नसेल माझा हात
ह्या तुझ्या मित्रासमोर जर मी तो केला पुढे
तर मला वाटतं तो विशेष, घेणार नाही आढेवेढे

फिलिन्त:
हा बहुमान मला मिळावा, हीच फक्त माझी आस
त्याकरिता देऊन टाकीन, बेलाशक मी माझा श्वास

अल्सेस्त:
तुमच्या आनंदाला नसो किनारा, हीच माझी प्रार्थना
परस्परांविषयी तुमच्या, अढळ राहोत भावना
दुनियेने नाडलेला, अन्यायाने वेढलेला, असा मी एक कृमी
जिथे पापाची जीत होते, तिथून निघून जाईन मी
शोधेन कुठेतरी जगात लहानसा एक कोपरा
प्रामाणिक माणसाला जिथे मिळेल थोडा आसरा

(अल्सेस्त निघून जातो.)

फिलिन्त (एलिआन्तला):
मला वाटतं हा पुन्हा, फुरंगटून बसला
येतेस माझ्याबरोबर, त्याची समजूत काढायला?

❋ ❋